पत्रे—चालू

**मानसिंग पिसाळ—राव प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : भेटीसाठी विनंती, पौ ९ साबान/ इ. स. १७२०-४० (४७०).

**मानसिंग जाधवराव—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : राज्यातील सरदारांचा जमाव, इ. स. १७२०-४० (४७७).

**मालोजी मचाले—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : भेटीचे वेळी निजामनमुलुकचे हुकुमाने गोपाळसिंगाकडून परगणे सारवाडच्या मुकासा अंमलाचा बंदोबस्त, २० रजब/इ. स. १७२०-४० (४२२).

**महादजी अंबाजी—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : रघुनाथ कृष्ण यांचा दहिगांवचा मुकासा अमल चालविणे, २० सवाल/इ. स. १७२०-४० (४१३) ; नथुराम चौधरी यांचा पंचोत्र्याचा अमल मल्हारपंतांकडे चालविणे व वाफगांव येथील बांधकामाबद्दल होळकरांकडील बेलदारांकडून पंचोत्रा अमल त्यास देवविणे, २३ रजब/इ. स. १७२०-४० (४८३) ; —**राव व आप्पा** (बाजीराव व चिमाजी बल्लाळ) : कासोदे येथील बाजाराच्या जकात मक्त्याची सनद शेखमीराच्या नांवाने देण्याची मागणी व पा। येरंडोलची बाबती सरदेशमुखीची ऐवज वसुली, ३ ज. खर/इ. स. १७२०-४० (४३३) ; नाईकजी कडू याजकडील हत्ती त्रिंबक हरी याजकडील कर्जापोटी गेला त्याची मागणी, ९ ज. खर/इ. स. १७२०-४० (४५६).

**महादजी कृष्ण—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : कंठाजी कदम यांची धुळे मुक्कामी भेट, भामेर बागलाण येथील वसूल, इ. स. १७२०-४० (४२४).

**यशवंतराव महादेव—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : खांबगावची ऐवज वसुली, २६ सफर/इ. स. १७२०-४० (४३५).

**रामचंद्र हरी—पंत प्रधान** (बाळाजी बाजीराव) : दमाजी गायकवाडाकडून पिंपळनेर व पानखेडे परगण्याची जप्ती व बाबती सरदेशमुखी ऐवजाची बंदी, माघ व. ४/इ. स. १७५१-५२ (४५८).

**राजसबाई निंबाळकर—बाजीराव प्रधान** : बेले व मुरुम या गांवच्या इनामाच्या राजपत्रांची मागणी, ४ मोहरम/ इ. स. १७२०-४० (४७२).

**राणोजी शिंदे—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : दमाजी व सेनापतीकडून बाबती अंमलाचा वसूल, १९ ज. वल/ इ. स. १७२०-४० (४७३).

**लखजी थोरात—बाजीराव पंत प्रधान** : सरकार कृपेची इच्छा, २५ र. वल/इ. स. १७२०-४० (४७६).

**लक्ष्मीबाई—रावप्रधान** (बाळाजी बाजीराव) : घोरपडे व बापूजी नाईकाकडून मुलुखास उपद्रव, इ. स. १७४०-५१ (४३४).

**लिंग दलवी—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : नरसिंगराव याच्या निरोपाप्रमाणे दोन-च्यारशे माणसांच्या सरंजामाची सोय केल्यास उदाजी दळवीबरोबर माणसांची रवानगी, इ. स. १७३४-४० (४७५).

**विष्णु गणेश—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : सरखेलाकडील लोकांचा पुणे महालास उपद्रव, (४३७).

**श्रीनिवास केदार—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : संताजी आटोळे याची भेट व तुकोजी आटोळे याची चाकरी करण्याची तयारी, इ. स. १७२०-४० (४६२).

**सवाई कठसिंग कदमराळ—पंतप्रधान*** : बावा यांचा सत्कार, (४३२).

**सयाजी गुजर—आप्पासाहेब*** : व्यंकटरावांचा फिरंगीयांशी तह व रायपूरचे मोर्चे उठविणे, १ र. वल/इ. स. १७३६-३९ (४५७).

**साबाजी नाईक निंबाळकर—बाजीराव प्रधान** : मल्हारराव दिवाणांशी मुलाखत, इ. स. १७२०-४० (४७१) ; —**चिमाजीपंत** : मुधोजी नाईक निंबाळकर व मल्हारराव यांचेमधील युद्ध, पौ १३ र. वल/ इ. स. १७२०-४० (४८०).

**सिदोजी थोरात—पंत प्रधान*** : उदाजी चव्हाणांची मिरज प्रांती प्रतिनिधीचे मुलखांत खंडणी वसुली, (४५०).

**सिदोजी निंबाळकर—बाजीराव प्रधान** : नारो भास्करमार्फत पाटस बारामती भागांत भेटीसंबंधी ठराव, १ र. वल/ इ. स. १७२६-२९ (३८९).

---

*मूळ नावांची निश्चिती नाही.

पत्रे—चालू

**सिवाजी जगताप—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : सावलदरबारेच्या मुकासा अंमलास अडथळा करणाऱ्या बाबुराव मल्हारकडील कमाविसदारास ताकिदीची मागणी, इ. स. १७२०-४० (४७८).

**सुलतानजीराव निंबाळकर—बाजीराव पंडित** : सरदेशमुखी मामला ऐवजाची गोरखोजी भापकराबरोबर रवानगी, इ. स. १७२०-२९ (३८८).

**सेख महंमद—राव प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : कोकणांतून उदाजी व कृष्णाजी पवार यांचे साताऱ्यास गमन, इ. स. १७२०-४० (४४१).

**संताजी व मानाजी जाधव—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ): चिमणाजी दामोदरचा कलह व निजामन्मुलुकचे तळ यामुळे अंमळनेर परगण्याची खराबी, इ. स. १७२०-४० (४७९).

**(फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं)**

**चिमाजी—(–)** : फत्तेसिंग भोसले यांजकडील चौथाई मामला, इ. स. १७२०-४० (४२१).

**शामजी कृष्ण—(–)** : स्वामींकरिता स्वारांची व्यवस्था व वेठ बिगारी ऐवजाची रवानगी, १७ साबान, गुरुवार/ इ. स. १७३२-३३ (३७९).

**संभाजी शिंदे व राघो केशव—(–)** : बडनेर वगैरे महालांच्या वसुलास फत्तेसिंग भोसले यांच्या कमाविसदारास त्रिंबक विश्वनाथ यांचा अडथळा, ४ रमजान (४१६).

**(फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं)**

**(–)—आप्पा***: प्रतापराव मोरे व द्वारकापा जाधव यांची पथकें फत्तेसिंग याजबरोबर आहेत अशी बळवंतरावाकडून माहिती, इ. स. १७२०-४० (४१७) ; गुमटास शिंदे, नरगुंदे यांचे मोर्चे, २१ सवाल/ इ. स. १७२०-५१ (४४९) ; बजाजी आटोळे यांजकडील सरंजामाची उदाजी आटोळे यांस पूर्वीप्रमाणे राजश्री स्वामी (शाहू) कडून देणगी, इ. स. १७२०-४० (४६४).

**(–)—खंडो गणेश** : शामलाकडील वनखल येथील कबिल्यास कराच्या तगाद्याची मनाई, ६ मोहरम, सु. ११३५/ २८ मे १७३४ किंवा १८ मे १७३५ (३७०).

**(–)—चिमणाजीपंत** : रघोजी कदमसंबंधी तक्रार, इ. स. १७२०-४० (४३१).

**(–)—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : सुलतानपूरच्या बाबती वसुलासंबंधी मोकासदार यांची चालढकल, इ. स. १७२०-३१ (४३०) ; दुर्जनसिंगाने गंगाजी गायकवाड याचा पराभव केल्यामुळे दाभाडे यांच्या फौजेचे सुरत प्रांतातून तळेगांवी आगमन, इ. स. १७२०-४० (४५३).

**(–)—पिलाजी जाधव** : प्रधानांच्या आज्ञेनुसार ओझरचा गुमास्ता काढून घेण्याचा देवजी सोमवंशीचा प्रयत्न (४५४) ; फौजेच्या समजाविशीसाठीं ऐवजाची मागणी, २२ जिल्काद/इ. स. १७२०-४० (४८२).

**(–)—राव***: गोरखोजी भापकर यांस फत्तेसिंग भोसलेकडून सरंजाम देणगी व बहुमान, इ. स. १७२०-४० (४११) ; सयाजी गुजरसंबंधीची पत्रें रामाजी दामोदर याचे स्वाधीन, २१ रमजान/इ.स. १७२०-४० (४१४) ; फत्तेसिंगाकडील बाबती चौथाईचा अंमल, पौ २ ज. वल/इ. स. १७२०-४० (४१५).

**(–)—राव व आप्पा** (बाजीराव व चिमाजी बल्लाळ) : गोविंदराव चिटणीस व भास्करराव वैद्य यांच्या पत्रांची रवानगी, २० ज. खर/१ नोव्हेंबर १७३५ (३८०) ; संभाजी भोसले याजकडील सुजानगिरी गोसावी याचे कर्जाची फेड, इ. स. १७२०-४० (३८२) ; पिंपलगांवचा मोकासा रामाजीपंत दिवाणास मिळण्याबाबत तेथील सुभेदारास पत्राची मागणी, २० जिल्हेज/इ. स. १७२०-४० (४१२) ; गोरखोजी भापकर यांचे फौजेसह स्वामींकडे गमन, ६ साबान/इ. स. १७२०-४० (४१८) ; व त्याच्याकडील थकलेली बाकी, इ. स. १७२०-४० (४१९) ; सोलसकराकडून पैठण महालाची मामलत, इ. स. १७२०-४० (४६७).

**(–)—संभाजी नारायण, संभाजी मोरेश्वर व सुंदर जनार्दन** : शामलाकडील कबिल्यास कराची माफी, ६ मोहरम, सु. ११३५/२८ मे १७३४ किंवा १८ मे १७३५ (३७१-३७२).

---

*मूळ नावांची निश्चिती नाही.

**पत्रे—चालू**

**(प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं)**

शिवाजी विश्वनाथकडील वसूल, इ. स. १७२०-४० (४२५) ; मेहुणबारे महाल त्रिंबकराव सेनाखासखेल व चिमणाजी बल्लाळकडे निमेनिम आहे त्याप्रमाणे सनदांची मागणी, इ. स. १७२०-४० (४२७) ; राजधानीसंनिधच्या खटाव प्रांतात उदाजी चव्हाणांनी धामधूम करूं नये म्हणून आज्ञापत्र, इ. स. १७२०-४० (४५१) ; मोगल पळून गेल्यामुळे उदाजी चव्हाणांचा चितापुराजवळ मुक्काम, (४५२).

**याद्या :—** गुजराथ व माळवे प्रांतातील चौथाई व सरदेशमुखी निमी पंत प्रधान व निमी खंडेराव दाभाडे यांना दिल्याबद्दल व सुरतेच्या बाबती सरदेशमुखी वसुलाबद्दल कंठाजी बांडे व जमीनदारांना पत्रे देणे त्यांची, इ. स. १७२०-२९ (३७४) ; छत्रसिंग याचे आसामीची (३७५) ; सयाजी व अवधूतराव उध्दव यांचे मुलामाणसांचे सहाय्य करणे म्हणून सुलतानजी निंबाळकर यास पत्र देण्याची, इ. स. १७२०-४० (३७६) ; वस्त्रांची (३७७) ; लग्नाची आमंत्रणे देण्याची, इ. स. १७०७-२० (३७८).

**राजपत्रें :—** शाहू छत्रपतींचे जुन्नरचे देशाधिकारी कोंडाजी घाटगे यास कलस गांव इनाम दिल्याबद्दल, श्रावण व. १, रा. श. ४९/१६ ऑगस्ट १७२२ (३६४) ; खानदेश सुभ्याची सरदेशमुखी चिमणाजी बल्लाळ यास दिल्याबद्दल शाहू छत्रपतींचे बोरनारच्या जमीनदारास, वैशाख व. ५, रा. श. ४६/१५ मे १७२० (३६५) ; रघोजी व सवाई कठसिंग कदमराव यांनी माळव्यात लुटालूट केली ती लूट व पैसा बाजीराव बल्लाळकडे द्यावी म्हणून, चैत्र शु. ४, रा. श. ५५/२० मे १७२९ (३६६).

---

## पुडके क्रमांक ४

### का. सं. १६९ (४८६-६५४), सु. स. ११२१-११६८, इ. स. १७२०-१७६७

**पत्रे :—**

**अबदुल करीम—बाजीराव प्रधान** : सुभानजी पवारची धामधूम, अजीजभाई याचेकडील माणसाचा तंटचांत मृत्यु, इ. स. १७२०-४० (६०३).

**आनंदराव—चिमणाजी पंडित** (चिमाजी बल्लाळ) : शामलांकडील मुलुख जिंकल्यामुळे नवाबाची नाराजी, मक्केची वाटबंदी, पौ २० र. वल/इ. स. १७२०-४० (६३१).

**आनंदराव माधव—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : दतियाकर व रघुनाथसिंग यांचा स्नेह, इ. स. १७२०-४० (६४९).

**काशीराव शिवदेव—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : उत्तरेकडील युद्धाचे वर्तमान, इ. स. १७२८ (५६२).

**कुवरबहाद्दर—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : जाधव, शिंदे व इंगळे यांच्या घोड्यांची रवानगी, इ. स. १७२०—४० (६१४).

**कृष्णमाचार्य चितलदुर्गकर—बाजीराव बल्लाळ** : कर्नूलची दीवाणगिरी, नबाब व पंत प्रधान यांच्या भेटीची कल्पना, इ. स. १७२०—४० (४८८).

**कृष्णराव महादेव—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : जुन्नरकर मोगलांची भेट, पौ २८ र. वल/इ. स. १७२०-४० (५१०) ; खेड चाकण परगण्यात धामधूम करणाऱ्या मालजी रणसिंग याची सुटका, इ. स. १७२०-४० (५१४) ; साष्टी येथील जमावाची पाठवणी, भाद्रपद पौर्णिमा/इ. स. १७२०-४० (६४०) ; —**महादोबा** : नबाबाची भेट व चास येथे आगमन, जेष्ठ शु. ९/इ. स. १७४०-६० (५७१) ; —**आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : संगमनेर बेलापुरांत मनसब व जाहागीर देण्याचा ठराव व खर्चाकरितां ऐवजाची मागणी, १२ सवाल/इ. स. १७२०-४० (५७३).

**कृष्णाजी अनंत—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : अर्काटकर सफदरअलीखानाकडून ऐवजाची रवानगी, १९ सफर/१७३७-४० (५४६).

**कृष्णाजी बल्लाळ—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : बागजी व सोभाराम मुनशी यास औरंगाबाद येथे द्यावयाचा ऐवज, ज. खर/इ. स. १७३०-४० (५२१).

पत्रे—चालू

**केशव महादेव—अंबाजीपंत तात्या व बाबा***: येलमे सरंजामासंबंधी आप्पाजी भावजीची पाठवणी, निर्मलेत पवार बंडगर वगैरे सरदारांचा तळ व जवळ मोगल चंद्रसेन याचा तळ, पौ २२ रमजान/इ. स. १७२८-२९ (५०३).

**केसो विश्वनाथ—दादबा दाजी व रामबा**: दलपतरायाची धामधूम, कार्तिक व. ५/इ. स. १७२०-४० (५३२).

**कोनेर व्यंकटेश—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : बाळापूरच्या सरदेशमुखीचा अंमल देण्यास मोरोपंत व मोगल यांचा अडथळा येतो म्हणून रियायतखान व जमीनदार यांना ऐवजखानाच्या पत्राची मागणी, इ. स. १७२०-४० (४९५).

**खंडोजी माणकर—कृष्णाजीपंत** : राजापूर सुभ्याच्या हिशेबाची रुजुवात, टोपीवाल्यांच्या हालचालीमुळे तूर्त येणे रहित, १० मोहरम/इ. स. १७३३-६७ (६२३); —**शंकराजीपंत हशमनिवीस** : राजपुरी प्रांतीचा तह, १८ सफर/इ. स. १७३३-४० (६३६).

**गणेशभट आठले—राव अमात्य व पंत***: श्रीमंत, सैद लस्करखान व जानोजी निंबाळकर यांच्या भेटी, श्रावण शु. ९/इ. स. १७५१-५२ (५३९).

**गोपाळ भास्कर—अंताजीपंत** : चाकणकर मोगल व दाभाडे यांचा उपद्रव, विठ्ठल शिवदेव यांचे स्वार ठेवून मोगलांस शह, इ. स. १७२०-४० (५६४).

**गोविंद कृष्ण—पंत प्रधान व आप्पा** (बाजीराव व चिमाजी बल्लाळ) : तर्फ चाकण येथील दुतर्फा तह, ३ जिल्हेज/इ. स. १७२०-४० (५१८) ; —**आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : जुन्नरकर मोगलांचा उपसग व चाकण येथे रोखे झाल्याने रयतेची खराबी, १४ जिल्हेज/इ. स. १७२०-४० (५४४).

**गोविंद शिवदेव—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : शेवगांव परगण्याच्या बाबती सरदेशमुखीचा अंमल चालू रहाण्याबद्दल व आनंदराव सुमंत यांजकडील पागेच्या ऐवजास मालजी शिंदे यांजकडून तगादा होऊ नये म्हणून बंदोबस्त करण्यासंबंधी, ११ जिल्हेज/इ. स. १७२०-४० (५७६).

**गोविंद सिद्धेश्वर—चिमारावजी** (चिमाजी बल्लाळ) : सवदाणेस वेढा देण्यास हरकत, इ. स. १७२०-४० (५८५).

**चंद्रसेन जाधव—बाजीराव प्रधान** : भालकीहून यात्रेस आगमन, १५ ज. वल/इ. स. १७२०-४० (५०५) ; —**चिमणाजीपंत आप्पा** (चिमणाजी बल्लाळ) : कुशल कळवण्याबद्दल, पौ. २३ जिल्हेज/इ. स. १७२०-४० (६११) ; रणसिंग थोरात यास नासरजंग याजकडून मिळालेल्या जहागिरीस उपद्रव देणाऱ्या सुभानजी थोरात याचा बंदोबस्त, पौ ९ सफर/२५ एप्रिल १७४० (६१३).

**चिमणाजी दामोदर—दादजी** : दादजीचे सैन्यासह आगमन झाल्यामुळे समाधान, इ. स. १७२०-४० (५९२) ; —**बाजीराव** (बाजीराव बल्लाळ) : प्रधानास भेटण्याची इच्छा व्यक्त, इ. स. १७२०-४० (५९३).

**चिमणाजी बल्लाळ—रंभाजी निंबाळकर** : आगासिंगाने दिलेल्या गावची चौथाई वसुली, १० रजब/इ. स. १७२०-४० (५९९).

**जयराम व रामचंद्र सावंत—सदाराम** : वसईहून फिरंग्यांनी धरून आणलेल्या लोकात नारायणदासाचा शोध, ७ ज. वल, सु. ११३९/१२ ऑगस्ट १७३८ (६३८).

**जसवंतसिंघजी फौजदार—पंत प्रधान***: हरि परदेशी याची घोड्यासंबंधी सरकारांत खोटी फिर्याद, १ सवाल (६०२).

**जानराव खांबकर—अयाबा नाना** : जानोजी निंबाळकराचा कालोसी येथे उपद्रव, इ. स. १७२०-४० (५३५).

**जानोजी ढमढेरे—पंत प्रधान***: नवाबाच्या भेटीचे प्रसंगी सुप्याचे मुक्कामी येण्याचा विचार (४८७).

**जानोजी निंबाळकर—राव प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : नबाब रागावले असल्यामुळे शिमग्याचे सणास येण्याचे रहित, इ. स. १७३३-४० (५०६) ; धारराव यास भेटण्याची इच्छा, २२ सवाल/इ. स. १७२०-४० (५८७) ; नाजूक गोष्टींची बोलणी करण्यास मल्हारपंत खिममतराव यांची पाठवणी, इ. स. १७२०-४० (५८८) ; उदाजी चव्हाण यांचा करकंब, भोसे व परांडे प्रांती दंगा, २३ साबान/इ. स. १७२०-४० (५९६) ; संभाजी आंग्रे यांजकडील प्रांत चाकणची देशमुखी सुरक्षित चालावी

---

*मूळ नावांची निश्चिती नाही.

**पत्रे**—चालू

म्हणून महंमद अजिजखां याचा खानेअजम यास हुकूम, इ. स. १७२८-४० (६०४) ; —**चिमाजी राव आप्पा** : पंतप्रधानांच्या मुक्कामाची माहिती समजण्याची इच्छा, पौ २६ साबान/इ. स. १७२०-४० (५८९) ; —**नाना*** : क्षेम समाचार, इ. स. १७२०-४० (६०९).

**जागोजी मोहिते, मनोहर कोनेर—आप्पासाहेब** (चिमाजी बल्लाळ) : नरवर प्रांतातील वसुलासंबंधी फितुरी, गोपालसिंग व नवलसिंग यांची सबलगडावर स्वारी, १५ मोहरम/इ. स. १७२०-४० (६४८).

**तुम्बाजी अनंत—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : वालकीशी कटकट व तेथील पाटील यास पकडून रवानगी, १४ मोहरम/इ. स. १७२०-४० (५१२) ;—**आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : कानवाईकर व नासरजंग यांच्या भेटीची अत्यावश्यकता १८ सफर/इ. स. १७२०-४० (५२६) ; बीड, पाथरी प्रांती निंबाळकरांची व बऱ्हाणपुरास गोविंद हरि याची फौज असल्याने एक दोन स्थळे हस्तगत होण्याची संधी, ५ सफर/इ. स. १७२०-४० (५६१).

**त्रिंबक अनंत—पंत प्रधान व आप्पा** (बाजीराव व चिमाजी बल्लाळ) : रंभाजी निंबाळकर व डौलाखान यांना खानदेशच्या सरदेशमुखीसंबंधी नवाबाच्या ताकिदी, गोविंद सिद्धेश्वर याचे मुलखात भापकर, वांडे, पवार वगैरेची धामधूम, गोविंदराव पवार व अजीजखान यांची भेट, पौष, १३ जिल्हेज/इ. स. १७२०-४० (५५३).

**त्रिंबक नारायण—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : हरभट दीक्षित यास द्यावयाचा ऐवज, कोकणांत फिरंग्यांची धामधूम, १५ रजब/इ. स. १७२०-४० (६२४).

**नंदलाल कुवर तेजकर्ण मंडलोई—चिमणाजी** (चिमाजी बल्लाळ) : नागर सुभेदाराकडून गावाची लूटमार व सैदांचा दंगा, इ. स. १७२०-४० (६४७).

**नरसो कुसाजी—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : निजामनमुलुकने पाडलेल्या उदापूर व मढ या ठाण्यांची कृष्णराय याजकडून दुरुस्ती व वासुदेव जोशी यास वरघाटी फौजदारी अंमल घेण्यास मनाईची मागणी, मार्ग. शु. ४/इ. स. १७२०-४० (५१६) ;—**आप्पा** (चिमाजी बल्लाळ): अबदुल रसुलखान याजबरोबर चाकण येथे आगमन, माघ व. प्रतिपदा/इ. स. १७२०-४० (५३०) ;—**पंतप्रधान व आप्पा** (बाजीराव व चिमाजी बल्लाळ), सदारतखानाशी एकांतीत भेटण्याची इच्छा, आषाढ शु. ११/इ. स. १७२०-४० (५३१) ;—**चिमणाजी पंडित आप्पा**: अबदुल अजीजखानाच्या नांवाचे कोठीचे दस्तकाची मागणी, इ. स. १७२०-४० (५४१).

**नरसिंगराव नारायण, माधवराव गोविंद—दादोबा, नीळकंठराव, अंताजीपंत** : यजमानाकडे संगमनेर, बेलापूर येथील जहागीर करार, माघ व. १० (५३३).

**नारायण दीक्षित—बाजीराव प्रधान** : कायगांव येथील सनदेची खटपट न करण्याच्या सूचना, ज्येष्ठ शु. २/इ. स. १७२०-४० (४९३) ; मोगलअली याचा दिवाण गोविंद सिद्धेश्वर याची स्वराज्याचा अंमल व्यवस्थितपणे देण्याची हमी, श्रावण व. ५ (५०४) ; कायगांव हा गांव ब्राह्मणास न देता प्रधानाकडे देण्यास मोगलांची तयारी, इ. स. १७२०-४० (५०९).

**नारायण जोशी—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : गलवतांची परत रवानगी, १५ मोहरम/इ. स. १७२०-४० (६२९).

**पद्माकर देव—चिमणाजीपंत** (चिमाजी बल्लाळ) : रोज्याचे मुलाण्यास द्यावयाचा अंमल, भाद्र. व. १३/इ. स. १७२०-४० (५५१).

**पिलाजी जाधवराव—चिमाजीपंत आप्पा** (चिमणाजी बल्लाळ) : तुरुकताजखान व वाघोजी यांचा रयतेस उपद्रव, १६ रजब/इ स. १७२०-४० (४९८).

**फत्तेसिंग—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : ओझर व सुकेणे येथील अमलांची ऐवज वसुली, इ. स. १७२०-४० (६१२).

**फैजबक्ष—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : महंमद अन्वर यास भेटण्याची इच्छा, इ. स. १७२८-४० (५१५).

**बयाबाई सरगर—बाजीराव प्रधान** : जहागीर गावास खंडप्रभूचा उपद्रव, फसली ११३२/इ. स. १७२२-२३ (५९७).

---

*मूळ नांवाची निश्चिती नाही.

## दप्तर क्रमांक १, पुडके क्रमांक ४—चालू

पत्रे—चालू

**बळवंतराव चिमणाजी—राव** (बाजीराव बल्लाळ) : नबाबांकडे अमळनेर येथील जहागिरीचा द्यावयाचा अंमल, आषाढ शु. ११/इ. स. १७२०-४० (६०६).

**बहिरजी पांढरे—बाबा*** : मल्हारजी खिजमतरावच्या मतानुसार मदतीचे साहित्य (५९१).

**बहिरो नारायण—बाजीराव, चिमणाजी बल्लाळ** : शामलाने पळवून नेलेल्या स्त्रीची सुटका करून आणल्याबद्दल, श्रीवर्धन येथील महाजनकीचे वतन गहाण ठेवल्याबद्दल, ७ र. खर, सु. ११३६/१५ ऑगस्ट १७३५ (६३७).

**बाजीराव बल्लाळ—जानोजी निंबाळकर** : भुजंगराव व आनंदराव यांचे वतनास सहाय्यता, इ. स. १७२०-४० (५९०) ; **सिदी अंबर** : परस्पर दोस्ती, इ. स. १७२०-४० (६३४).

**बेगमसाहेब व महंमद फाजलखां—बाजीराव प्रधान** : महंमद दाऊदखा व नरसो कुसाजी यांस करंजे, ढमढेरे वगैरे यांचो सामीलात, इ. स. १७२०-४० (६०१).

**भिऊबाई—नाना** (बाळाजी बाजीराव) : नबाबाच्या भेटीची वार्ता समजण्याची उत्सुकता, अधिक चैत्र शु. ९/ इ. स. १७४०-६१ (५७४).

**मल्हारजी होळकर—पंत प्रधान** (बाळाजी बाजीराव): चंद्रसेनाचे पुत्र जसवंतसिंग जाधव यांचे भेटीची आवश्यकता, आश्विन व. १३/इ. स. १७५१-६० (६२०).

**महंमद दौलाखान—पंडित प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : सादतखानाचा गढचाच्या मुलखांत मुक्काम व नवाबाचे औरंगाबादेहून कूच, इ. स. १७२०-४० (६०७).

**महकुमसिंग—चिमणाजी आप्पा** (चिमणाजी बल्लाळ) : सरदेशमुख व मोकाशाची वसुली व महंमदखानाचे स्वारांसह आगमन, इ. स. १७२०-४० (६१६) ;—**बाजीराव प्रधान** : नंदुरबार परगण्यांतील गिराशांची भेट, फौजा आल्याने गांव वैराण, इ. स. १७२०-४० (६१७); कुंवर फत्तेसिगा-कडील मोकासा अंमलाच्या गावाचा बंदोबस्त, इ. स. १७२०-४० (६१८); कुंवर फत्तेसिंग व आवजी कवडे यांचे भेटीसाठी आगमन, इ. स. १७२०-४० (६१९).

**महिपती—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : कोचेहून जाटाच्या फौजेचे कूच, ४ र. वल/इ. स. १७२०-४० (६४४)

**महादजी घाटगे—चिमाजीराव** (चिमणाजी बल्लाळ) : अनेगोंदीत लष्करासह मुक्काम, सुलतानजीजवळ राव-साहेबांचा सैन्याबाबत जावसाल, इ. स. १७२०-४० (५५२).

**मुलाजमेदार—बाजीराव प्रधान** : गांडापूरच्या चौथाई सरदेशमुखीबाबत जाधवांची तक्रार, इ. स. १७२०-४० (५९४).

**मोरशेट करंजे—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : माधोसिंग आणि अनुपसिंग, पहाडसिंग यांच्या संघर्षात मोजुमखान व बांडे यांची माधोसिंगास व बुळ यांची पहाडसिंगास मदत व त्यासंबंधी खान व बांडे यांच्या नावान छत्रपतींच्या आज्ञापत्रांची मागणी, इ. स. १७२०-४० (४९९) ; नारोजी कडू याच्या पागेचा बंदोबस्त, तळेगांवी तुरूकताजखानाचा वेढा पडला असता दिलेल्या कर्जाची परतफेड, १४ सवाल/ इ. स. १७२८-४० (५४२).

**रावरंभाजी निंबाळकर—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : आनंदराव सोमवंशी यास गावास उपद्रव न देण्याबद्दल ताकिदीची मागणी, इ. स. १७२०-४० (५९८).

**राघो गणेश—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : चाकणच्या रयतेवर बेठ बिगारीसाठी मोगलांकडून होणाऱ्या जुलमाचा बंदोबस्त, २८ रजब, सु. ११३६/३ डिसें. १७३५ (५४३).

**रामचंद्र मल्हार—पंत प्रधान*** : खानदेश, संगमनेर प्रांतातील मोगलाई अमलाची जप्ती, ७ जिल्काद (५००).

*मूळ नावांची निश्चिती नाही.

पत्रे—चालू

**रामचंद्र गोविंद व राघो कृष्ण—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : चासगांवाकडून येणाऱ्या मोगलाई अंमलाची शिवनेरला शहाजी मियाकडे वसुली, २१ र. खर, सु. ११४०/३ जुलै १७३९ (५२८).

**रामाजी पाटील व नरहरी विठ्ठल—मोकाशी** : पिंपळनेरास निंबाळकरांच्या फौजांमुळे घबराट उडाली म्हणून रंभाजी व जानोजी निंबाळकर यांच्याकडील अभयपत्रांची मागणी, मोहरम, सु. ११४५/जानें.-फेब्रु. १७४५ (५३६).

**रामाजी रंगाजी—पंत प्रधान***: खुदाबादेहून घोडे व मोती आणण्यासंबंधी उदेपुरकरास पत्र देण्याची विनंती, वैशाख शु. १४ (६२७).

**रामाणा देसाई—राव** *: वेळूर परगण्याची आबादी, आप्पाजीपंताचा फितूर व योगानंदाच्या सुटकेची दिरंगाई (५३८).

**रेणुराय देशपांडे पैठणकर—आप्पासाहेब** (चिमाजी बल्लाळ): कटकावर छापा घालण्याचा बेत, नवाबाचा औरंगाबादेस व चंद्रसेन वगैरे फौजाचा अजंठ्यावर मुक्काम, उदाजी चव्हाण, सिदोजी घोरपडे यांचा फितूर, मार्ग व. ९/इ. स. १७३५-३६ (५६०).

**लखमगौडा—राव** (बाजीराव बल्लाळ) : खानापूर प्रांती आल्यावर चिरंजिवांची फौजेसह पाठवणी, २७ र. वल इ. स. १७२०-४० (६३९).

**लक्ष्मणराव राम—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ): पैठणच्या चौकीच्या तंटयासंबंधी खिफायतखानाशी तह व ऐवजखान लाडसांगवीवर असल्याने मुलकास शह, इ. स. १७२०-४० (५११) ;—**आप्पा** (चिमाजी बल्लाळ): आटोळे मंडळीकडून ऐवजवसुली, जमालुदीनखान व आवजी कवडे यांचे युद्ध, १० जिल्हेज/इ. स. १७२०-४० (५२३).

**लक्ष्मण बाबाजी—राव** (बाजीराव बल्लाळ): रायचुरहून उदगिरास निंबाळकरांकडे बातमीसाठी आगमन, १६ ज. वल/इ स. १७२०-४० (५१९).

**लक्ष्मण विश्वनाथ—पंत प्रधान***: अमरभुईचे ठाण्यांतील लोकांच्या कबिल्याची पकडापकड, १ र. खर (६४१).

**वासुदेव दीक्षित—पंत प्रधान** (बाळाजी बाजीराव): अमिसुदि हुसेनखा याच्या जहागिरीची जप्ती, इ. स. १७४०-६१ (४९४) ; नेवासे परगण्यातील दरगाहकुलीखानाच्या जहागिरीस उपद्रव होऊ नये म्हणून सूचना, इ. स. १७४०-६१ (५७२).

**विसाजी गोविंद—पंत प्रधान***: सारोळ्याच्या शीवतंट्याचे चौकशी कामात लिंगोजी पवार याची गैरहजेरी, (४९२) ; केडगावचे पाटील तुरुकताजखानाच्या बळावर गावची खंडणी करीत नाहीत म्हणून तुरुकताजखानाकडील करंदी ह्या जहागिरी गांवाची मागणी, २१ ज. खर (५०८) ; सारोळे कासर गावचा शीवखटला, तुरुकताजखानाकडून यावयाच्या बाबती अंमलाची वसुली, २७ ज. खर/ इ. स. १७२०-४० (६००).

**व्यंकटराव—रावजी साहेब** (बाजीराव बल्लाळ): मुकुंदराव हरकारे यांस आलमपूर जहागीर, इ. स. १७२०-४० (६०५).

**व्यंकाजी—श्रीधरराव** : मोगलाशी लढाई, कार्तिक शु. ६ (५६७).

**व्यंकाजी शिवदेव—बापूजीपंत*** : प्रांतास फौज न येण्याबद्दल करार (६५१).

**शंकराजी निकम—आप्पा** (चिमाजी बल्लाळ): सैद लष्करखान फौजेसह जुन्नर मावळकडे येणार असल्याने सर्वत्र दक्षता, २१ साबान/इ. स. १७२०-४० (५२४-२५) ; वैजापूरच्या मोगली फौजदाराकडून रयतेचा छळ, इ. स. १७२०-४० (५८१) ; इंग्रजाकडील जहाजांचा शोध, गंधकाची खरेदी, २८ जिल्हेज/इ. स. १७३९-४० (६२८) ; दवणेकडे फौजेचे कूच, २४ जिल्हेज/इ. स. १७३९-४० (६४२).

**शंकराजी रघुनाथ—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ): पडतूर परगण्याच्या जमाबंदीसंबंधात कृष्णाजीपंताने फितुरी केली म्हणून त्याची उमरखेडकर याजकडून कैद, १ रमजान/इ. स. १७२०-४० (५०७).

---

*मूळ नावांची निश्चिती नाही.

**पत्रे**—चालू

**शामजी गोविंद—आप्पा** (चिमाजी बल्लाळ): मोगलांकडून खरगोण व हांडे ह्या तालुक्यांची मागणी, नासरजंगाचे नांदेडेजवळ आगमन, २० मोहरम/इ. स. १७२०-४० (५२०) ; अबदुल अजीजखानाचे पुत्रास नायबी, खरगोण व हांडिया या सरकारातील परगण्यांच्या परवान्याची यजमानाकडे रवानगी, नासरजंगाचे हैद्राबादेस कूच, १५ मोहरम/इ. स. १७४०-४१ (५६३).

**श्रीनिवास गिरिधरलाल—बाजीराव प्रधान** : गदग, लक्ष्मेश्वर, सोंधे व कितूरकडे मुलुखगिरीस नेमणूक, इ. स. १७२०-४० (६१५).

**सटवोजी जाधव—आप्पा** (चिमाजी बल्लाळ): प्रधानाकडील हकीकत समजण्यास भिवरावच्या पत्राची अपेक्षा, १९ जिलकाद/इ. स. १७२०-४० (६४६).

**सदाशिव बल्लाळ—पंत प्रधान*** : गंगाराम याच्या राऊतांचा व सावकारांचा सलोखा, पौ. ७ ज.वल (४९१) ; —आप्पा (चिमाजी बल्लाळ): जाट व कल्याणसिंगाचा दंगा, गिधोसी गावी ऐवजाची तूट, स्वारांच्या रोजमुऱ्याची दैनावस्था, २४ साबान (६४५).

**साबाजी निंबाळकर—चिमाजीपंत** (चिमाजी बल्लाळ) : पंतप्रधानांबरोबर साबाजी याचे दोन्ही पुत्र मुलुखगिरीस गेले असल्याने त्यांचेकडील कुशल कळण्याची उत्सुकता, इ. स. १७२०-४० (६१०).

**सिदी अंबर—बाजीराव प्रधान** : हरिपंत याजकडील देशमुखीचा अंमल, २६ सवाल/इ. स. १७३३-३४ (६३५).

**सिदोजी तुपे—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : मोगलांचा शहराबाहेर तळ, पौ. १५ रमजान/इ. स. १७२०-४० (५०१).

**सिदोजी राऊत—आप्पासाहेब** (चिमाजी बल्लाळ) : जानवा व महंमद आलम यांची भेट, महंमद अलमखान यास औरंगाबादची सुभेदारी, १८ मोहरम/इ. स. १७२०-४० (५२९).

**सिवराव घाटगे—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : सरंजाम घेऊन चाकरीस रहाण्याची इच्छा, इ. स. १७२०-४० (५९५).

**सिताराम हरी—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : निजामन्मुलुक याचे औरंगाबाद येथे आगमन, सरकारच्या सनद व ताकिदांस जमीनदार बेजबाबदार/इ. स. १७२०-४० (५४८-५५०).

**सुलतानजी निंबाळकर—बाजीराव प्रधान** : लष्करचा गवगवा मिटवून स्वामींचे आज्ञेनुसार आगमन, इ. स. १७२०-४० (४८९) ; लक्ष्मणराव आणि भापकर यांचा बीड प्रांती दंगा, २० र.खर/इ. स. १७२०-४० (५८६).

**(फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली)**

**कृष्णाजी चंदो**—(–) : कडपेकरांकडून गुमनाडपाल्यास खंडणी (६२२).

**चिमणाजी बल्लाळ**—(–) : शामलांकडून रेवसगढी हस्तगत व झुंजांत सिदीसातचा मृत्यू, २१ जिल्हेज, सु. ११३६/ २२ एप्रिल १७३६ (६३२).

**वासुदेव नारायण**—(–) : कबिल्यासह मकबुल अलम याची नबाबाशी भेट व पागेच्या ऐवजाची वसुली, इ. स. १७२०-४० (५५७).

**(फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली)**

(–)—**आनंदराव** : निजामन्मुलुक याच्याकडून दलपतराव यास जहागीर, इ. स. १७२०-४० (५५६).

(–)—**आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : जुन्नर प्रांतातील महालांतून फौजदारी अंमलाची वसुली, इ. स. १७२०-४० (५२२) ; येसाजी बलकवडे व मोगल यांचे युद्धातील हरवलेल्या वस्तूंचा शोध, एप्रिल १७३९ (५२७) ; शेख इस्माइल याचे समाधान करण्याचा प्रयत्न, इ. स. १७२०-४० (५४५) ; नवाबाच्या लष्करातील बातमीपत्रांची रवानगी, इ. स.१७२०-४० (५४७) ; हबशी यांचे कबिले सुरक्षित ठेवण्यास अडचणी, १६ सवाल/इ. स. १७३३-३४ (६३३) ; देवगडकरांकडून हत्तीची देणगी, इ. स. १७२०-४० (६४३).

(–)—**कमाविसदार व चौकीदार** : मुंबईच्या वखारीतून मालाची खरेदी विक्री (६३०).

---

*मूळ नावांची निश्चिती नाही.

दप्तर क्रमांक १, पुडके क्रमांक ४—चालू

**पत्रे—चालू**

(–)—**पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : चिंकिलीजखानमुळे संगमनेर व खानदेशांत फितुरी, इ. स. १७२०-४० (४९७) ; बीड, अंबड प्रांतातील बाबती अंमल, २० र.वल (५१३) ; मक्बूल अलमनें अटकाविलेल्या खंडेराव हजारी याच्या कबिल्याची सुटका, पौ. ८ रमजान (५१७).

(–)—**पंत प्रधान व आप्पा** (बाजीराव व चिमाजी बल्लाळ) : हैबती पाटलाकडील अंमलास दाभाडे यांचे लोक अडथळा करतात म्हणून ताकीदपत्रांची मागणी, पौ. १३ जिल्हेज/इ. स. १७२०-४० (५०२).

(–)—**बाजीराव पंडित** (बाजीराव बल्लाळ) : दरबार खर्चासाठी द्यावयाची वरात, इ. स. १७२०-४० (४८६) ; नबाब साहेबांकडून पुत्रोत्सवाची वस्त्रें, इ. स. १७२०-४० (४९०).

(–)—**बाबा*** : नारो भिकाजी याजकडील गेलेल्या वस्तभावेचा शोध लावल्याबद्दल नबाबाचा हुकूम, सोभागसिंग व सिन्नरकरांचा नाशिक वगैरे प्रांतात धुमाकूळ, कृष्णराव याजकडून सोनगड व फतेसिंगाकडून त्रिंबक सोमवंशी याजकडील ठाणी हस्तगत, पौ. २६ मोहरम (५५९).

**(प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं)**

निजामअली व जानोजी भोसले यांचा कलह व अखेर झालेला तह ठराव, इ. स. १७५५-५९ (४९६) ; इस्मालखान यास वऱ्हाडची सुभेदारी, सराफाने प्रधानाकडे द्यावयाच्या ऐवजाचा परवाना, इ. स. १७४०-४९ (५३४) ; फुलवडेची पाटीलकी अमानत, तर्फ मिन्हेरे येथे सिवनेरकरांचा उपद्रव, बोरघर सितेवडी येथील पाटलावर निमगिरीकरांचा हल्ला (५३७) ; वैजापूरचा फौजदार व जमीनदार देशमुख यांचा तंटा, इ. स. १७२०-४० (५४०) ; फौजेच्या पत्रव्यवहाराची रवानगी (५५४) ; बाबूजी नाईक, दखणिमिया व नरसोपंत यांची मकबूल आलमतर्फे श्रीमंतांकडे पाठवणी (५५५) ; खंडागळे यास पुण्याहून पत्रें येत असल्याची बातमी, इ. स. १७२०-४० (५५८) ; बिलंदखान व सावजी ढेकळे यांचा जामोदात फौजेसह मुक्काम व लढाइत मेलेल्या सरकारी घोडीचा ऐवज देण्याबद्दल जफरयारखान व जामोदकर यांना तगादा, इ. स. १७२०-४० (५६५) ; गौतमाबाई होळकर व सखंभट यांच्या नांवे वेरूळ व मनरथ ह्या गांवाचे फर्मान आल्याची बातमी (५६६) ; सैन्यास रोजमुरे मिळून एखादी मातबर जागा मिळाल्यास जिल्हयाचा कबजा होण्याची शक्यता, इ. स. १७२०-४० (५६८) ; ताम्राशी विघाड झाल्यामुळे उदाजी पवार यांनी सावध रहाणे आवश्यक (५६९) ; मोगलांकडून करवून घ्यावयाची कामे, बिजागड, हांडिया येथील परगण्यांचे परवान्यांची रवानगी, इ. स. १७२०-४० (५७०) ; मोगल अलीखान यास सोमवंशी, जाधव वगैरे सामील होऊन खानदेशांत दंगा, २५ मोहरम/इ. स. १७२०-४० (५७५) ; कडे परगण्यांत रंभाजीच्या पुत्राचा दंगा, इ. स. १७२०-४० (५७७) ; लष्कराचे भीमेच्या पलीकडे कूच, (५७८) ; मोगल भानुपुरा-अलीकडे आला नसल्याची बातमी, (५७९) ; ऐवज देण्याबद्दल मोहकमसिंग यास ताकीद, इ. स. १७३० (५८०) ; वैजापूरच्या फौजदाराकडून रयतेचा छळ, इ. स. १७२०-४० (५८२-८३) ; गोटांतील घोडी व माणसे मारणाऱ्यांचे पारिपत्य करण्यासाठी आज्ञेची जरूरी (५८४) ; आवजी कवडे यानी घेतलेले वडजाईचे ठाणे कोणत्याही कारणाने परत जाऊ न देण्याची सूचना, पौ. २० जिल्काद (६०८) ; मुलांची सुटका व बहादुरबंडासंबंधी बोलणीं, (६२१) ; तरांड्यावरील भिकाजी नाईक व कृष्णाजी यांचेमार्फत झुंजाची बातमी, पौ. ११ रमजान (६२५) ; इंग्रजांचे गलबत पकडले त्यावर झालेली तांदुळ व पोहे यांची मिळकत (६२६) ; बुंदेले यांनी दिलेल्या मुलुखाचा बंदोबस्त करण्यासाठी मीरखान, दादोपंत वगैरेंची फौजेसह रवानगी, ११ मोहरम/इ. स. १७३०-४० (६५०) ; खावंदास वाटणारी जिवाची भीति (६५२) ; घबराटीमुळे श्रीपतराव व सरखेली यांच्या प्रांतामध्ये रयतेचे पलायन, पौ. १४ जिल्काद (६५३) ; मसलतीत कारभाऱ्याचे अपयश (६५४).

---

*मूळ नांवांची निश्चिती नाही.

## दप्तर क्रमांक २

पूडके क्रमांक १ तें ४

### पुडके क्रमांक १

**का. सं. १७२ (६५५-८२६), सु. स. ११२१-११७०, इ. स. १७२०-१७६१.**

पत्रें :

**अमृतराम---पंत प्रधान***: शामलांकडील सेवा करीत असल्याचे, १९ जिल्हेज (७९४).

**आप्पाजी मैराळ---रावसाहेब** (माधवराव बल्लाळ) : गुजरांची धामधूम व महालांचा वसूल, ४ सवाल, सु. ११६९/१२ फेब्रुवारी १७६९ (८१४) ; शमीच्या पाल्याची रवानगी, २७ सवाल, सु. ११६९/७ मार्च १७६९ (८१५).

**आबाजी जोशी---पंत प्रधान***: नाईक यांच्या पत्राची मागणी व भाऊ स्वामींची भेट, आश्विन व. १ (७२०).

**आनंदराव व सालजी धोंड वगैरे---पंडित पंत प्रधान***: लष्कराकडे कूच (७९६).

**आनंदराव बाबुराव---रावसाहेब***: कुशल वर्तमान, पौ. २३ रजब (७४५).

**आवजी कवडे---पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : सदाशिव दीक्षित यांजकडील ऐवज व महालांतील वसूल, १ मोहरम/ इ. स. १७३९-४० (७८७).

**उधो व केसो बल्लाळ---पंत प्रधान***: रामायणाची पोथी रवाना (७३४).

**अंताजी नारायण---आप्पा***: कर्जाची मागणी, १२ रवल (६९९) ; भदावरच्या मागणीची रसद आणि सावकाराचा तगादा, २९ सफर (७००).

**अंताजी विठ्ठल---पंत प्रधान***: मोकाशाचा वसूल, २९ जखर (८२५).

**कचेश्वर---पंतप्रधान***: जेजुरी येथील तळ्यासाठी गाड्यांची मागणी, आश्विन बहुल ६ (८०८).

**काशी अनंत---राव प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : व्यंकट नारायण याचे फौजेसह कर्नाटकांत आगमन व सरदारांचा परामर्ष, इ. स. १७२०-४० (७६७).

**काशीपुरी महंत---बाजीराव (बल्लाळ) प्रधान**: धर्मकृत्यास सरकारकडून नेमणूक, इ. स. १७२०-४० (७९२).

**कृष्णंभट श्रीवर्धनकर---बाजीराव (बल्लाळ) प्रधान**: उदरनिर्वाहाची सोय, इ. स. १७२०-४० (८१०).

**कृष्णराव महादेव---आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : निजामनमुलुक याचा दिल्लीच्या बादशहाबरोबर पत्रव्यवहार, पौष शु. १४, सु. ११३७/४ जानेवारी १७३७ (७०४) ; **---पंतप्रधान** (बाजीराव बल्लाळ) : मल्हार होळकर याजकडे इमारतीचे लाकूड रवाना, इ. स. १७२०-४० (७२१); राजापुरांतील देवघेव, २० सवाल/ इ. स. १७२०-४० (७२२) ; वसुलीतील गैरव्यवस्थेसंबंधी निवेदन, इ. स. १७२८-२९ (८००).

**कृष्णाजी अनंत---रावसाहेब** (बाजीराव बल्लाळ) : पाईनघाटच्या हुंड्या कृष्णाजी नाईक याजकडे रवाना, १७ ज. वल/इ. स. १७३७-३८ (६५८).

**कृष्णाजी आनंद---रावप्रधान***: राजोरी येथील चांभाराच्या पट्टी रोख्यावर मनाई (७९७).

**कृष्णाजी महादेव---पंत प्रधान***: इजाऱ्याच्या ऐवजाबाबत सूट, १३ साबान (७५९).

**कृष्णाजी दादा---पंत प्रधान***: सरकारी ऐवजाचा हिशेब, १ मोहरम (७७४).

**कृष्णाजी नाईक---पंत प्रधान** (बाळाजी बाजीराव) : काशीयात्रा, ज्येष्ठ शु. ५/इ. स. १७४६-४७ (७९८).

**कृष्णाजी हरी---आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : तुळाजी शितोळे याजकडील यावयाचा ऐवज व अंजनवेलीचे मोर्चे, १२ मोहरम, सु. ११३५/३ जून १७३४ (६९८).

**केसो विठ्ठल---राव प्रधान***: टिकरी-खानापूर येथील हलाखी (७७१).

**केसो सहदेव---पंतप्रधान***: स्वारीचे जिन्नस रवाना, १२ र. खर (७१९).

**गणेशभट आठल्ये---राव व पंत** (बाळाजी बाजीराव व सदाशिवराव भाऊ) : लोणी येथे श्रीमंतांचा मुक्काम व निंबाळकर आणि सय्यद लष्करखान यांची भेट, श्रावण व. १/इ. स. १७५०-५१ (७४७).

---

* मूळ नावांची निश्चिती नाही.

पत्रे—चालू

**गोपाळ उद्धव—पंत प्रधान***: येसाजी नाईक याजकडील सरदेशमुखीचा ऐवज, १७ मोहरम (७१४).

**गोपाळ शंकर—आप्पा***: लक्ष्मण राम यांचा ऐवज रवाना, १८ रजब (६६९).

**गोरखोजी भापकर—पंत प्रधान***: गांवाच्या सनदा रवाना (७५४).

**गंगाबाई व द्वारकाबाई—बाजीराव***: बैलांची मुक्तता, इ. स. १७२०-४० (८०३).

**चिमणगीर गोसावी—राव***: भेटीस आगमन (७४८).

**चिमणाजी बल्लाळ—नाना** (बाळाजी बाजीराव): महादजी कान्हो याजकडून यावयाचा ऐवज वसूल, २३ सफर इ. स. १७३४-३५ (६७४); मायाजी तोडकर यास द्यावयाचा ऐवज, २० सफर, सु. ११३९ २९ मे १७३८ (६७५); जानोजी ठोंबरे यास द्यावयाचा ऐवज, १८ सफर, सु. ११३९/२७ मे १७३८ (६७६); हुंडी सातारा येथे रवाना व महालातून ऐवजाची आवक, ११ सवाल, सु. ११३७/ २ फेब्रुवारी १७३७ (६७९); गंगाधर जोशी याजकडून ऐवज रवाना, २० सफर/ इ. स. १७२०-४० (६८०); खानदेश येथील बाबतीचा ऐवज सातारा येथे रवाना, १३ सवाल/ इ. स. १७२०-४० (६८१); गंगादास व सिरोमणदास यांच्या हुंड्या व परवाना यावर हरकत, २८ मार्च १७३७ (६८२); बापूजी महादेव यांस द्यावयाचा ऐवज, १६ सफर, सु. ११३९/२५ मे १७३८ (६८३); त्रिंबक चव्हाण यांस द्यावयाचा ऐवज, १८ सफर, सु. ११३९/२७ मे १७३८ (६८५); ऐवजाची पोच, १८ सफर, सु. ११३९/२७ मे १७३८ (६८६); दुर्जनसिंग यास द्यावयाचा ऐवज, १९ मोहरम, सु. ११३९/१७ एप्रिल १७३९ (६८७); —**बाबुराव राम**: सातारा येथे ऐवज रवाना, २४ रमजान/इ. स. १७२०-४० (६७७); बाकी ऐवज वसईला रवाना, २ जिल्काद/इ. स. १७२०-४० (६७८); राणोजी भांडवलकर यास द्यावयाचा ऐवज, ५ जिल्काद, सु. ११३८/१४ फेब्रुवारी १७३८ (६८४); त्रिगुला आचारी यास द्यावयाचा शिधा, २५ रमजान/इ. स. १७२०-४० (६८८); रघा भट याचे हवाली करावयाचा ऐवज, १ जिल्काद, सु. ११३८/१० फेब्रुवारी १७३८ (६९०); जळगांव व जांबूत येथील इजाऱ्याचा ऐवज आणि खंडोजी माणकर याजकडील रोजमुरा, २३ रमजान/इ. स. १७२०-४० (६९१); —**पिलाजी जाधव**: बाबूजी नाईक यास ऐवजाची पोच, ४ जिल्काद, सु. ११३५/१५ मार्च १७३५ (६९२).

**चिंतामण अनंत—रावसाहेब***: तिरुपती येथील स्वामींशी भेट व ब्राह्मणांचा उपद्रव, पौष व. ७ (७४०-७४१).

**जनकोजी तोरसकर—रावप्रधान** (बाजीराव बल्लाळ): त्वरित स्वार होऊन हजेरी, इ. स. १७२०-४० (७२५).

**जनार्दन—तात्या***: यात्रेहून परतताना लूट व विहिरीचे बांधकाम, फाल्गुन व. ११, श. १६५४/१ मार्च १७३३ (७०८).

**जिवबा—प्रधान***: स्वामींचे माळशिरस येथे वास्तव्य (७१८).

**जोत्याजी तोरसकर—रावसाहेब***: कुत्रींची रवानगी (७४४).

**तुको नरसिंह—आप्पा** (चिमाजी बल्लाळ): तुरुकताजखान यास द्यावयाचा ऐवज, २ रजब/इ. स. १७२०-४० (७०३).

**तुळजोजी घाटगे—रावप्रधान** (बाजीराव बल्लाळ): कर्जाचा परिहार व चव्हाण यांची घोरपडे यांच्याकडे नोकरीस जाण्यास नाखुशी, इ. स. १७२०-४० (७६९).

**त्रिंबकजी इंगळे—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ): सूरगड येथील वस्तभावेची व्यवस्था, ११ मोहरम, सु. ११३५ २ जून १७३४ (७५२).

**त्रिंबकजी ढमढेरे—पंत प्रधान***: जमावासह आगमन व उरल गांवास उपद्रव, भाद्र. व. ६ (७५१).

**त्रिंबकजी धुमाळ—रावसाहेब व आप्पा** (बाजीराव व चिमाजी बल्लाळ): कर्ज परत करावयाचा कतबा, ११ सफर, सु. ११३६/२२ जून १७३५ (७४९).

**त्रिंबक हरी—पंत प्रधान***: जिनसांची खरेदी, पौष वहुल १२ (७५०).

*मूळ नांवांची निश्चिती नाही.

**पत्रे—चालू**

**देशमुख, देशपांडे मावळ—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : आगीमुळे गांवकऱ्यांना त्रास, २९ जिल्काद, सु. ११३२/१४ मे १७३२ (७९५).

**नथुराम चौधरी—पंत प्रधान*** : मोगलाईतील अंमल (७७२).

**नरसिंग महाडिक—रावप्रधान*** : कुशल वर्तमान, आश्विन व. ९ (७२७).

**नरसोजी कोठवळे—रावसाहेब*** : किराणा मालावरील आंग्रे यांचे हशील, १४ जिल्हेज (८१७).

**पिलाजी जाधव—महादजीपंत** : दिवाणाचा पाठवावयाचा ऐवज, औरंगाबाद येथील जमाबंद्या अपूर्ण व बुंदेलखंडातील सरकारी ऐवजाचा हिस्सा, ११ सफर/इ. स. १७२०-५१ (७०९) ; **—पंतप्रधान***: हत्तीची रवानगी, इ. स. १७२०-५१ (७२८) ; बाबूजी नाईक व प्रधान यांची भेट, सु. ११३५/इ. स. १७३४-३५ (७२९) ; औषधासाठी शंखांची मागणी, इ. स. १७२०-५१ (७३०) ; पालखीच्या दांड्या रवाना, इ. स. १७२०-५१ (७३१) ; वस्त्रांची पोच, इ. स. १७२०-५१ (७३२) ; आप्पांचा आजार, इ. स. १७३६ (७७५) ; देवगडकडील माहुताची नेगणूक, १ र.वल,सु. ११३६/११ जुलै १७३५ (७७६) ; विसाजी केशव याचा उपद्रव, इ. स. १७२०-५१ (७७८) ; संभाजी जाधव याचा आजार, ११ मोहरम/इ. स. १७२०-५१ (७७९) ; विठोबा वैद्य यांचा आजार, २२ मोहरम/इ. स. १७२०-५१ (७८०) ; वंशलोचन रवाना, इ. स. १७२०-५१ (७८१) ; दरेखान याची चाकरी, १९ ज. वल/इ. स. १७२०-५१ (७८२) ; बोरसर येथील इनामाची चौकशी, इ. स. १७२०-५१ (७८३) ; वाजी संकपाळ याजकडील लोकांची मुक्तता व जामीन, इ. स. १७२०-५१ (७८४) ; आप्पाजी सामराज यास इनाम, इ. स. १७२०-५१ (७८५).

**पंताजी शिवदेव—पंत प्रधान*** : कुशल वर्तमान, (७३६).

**बाजीराव बल्लाळ—बाबुराव मल्हार** : माहूर परगण्यातील ऐवजाची पोच, ३० ज.वल,सु. ११३४/२७ नोव्हेंबर १७३३ (६५५) ; **—मोरसेट करंजे**: कापडांची पोच, २९ सफर, सु. ११२६/२५ ऑक्टोबर १७२५ (६५६) ; **—सदाशिव पटवर्धन**: व्याजासंबंधी, २७ सवाल, सु. ११३८/६ फेब्रुवारी १७३८ (६५९) ; **—बाबुराव**: बापूजी श्रीपत यास द्यावयाचे कापड, २ साबान/इ. स. १७२०-४० (६८९) ; **—रामचंद्र महादेव**: हंसाजी देशमुख याचे वतन, इ. स. १७२०-४० (८२६).

**बापूजी महादेव—बाबुराव बल्लाळ** : ऐवजाची पोंच, माघ व. १, श. १६५९/२५ जानेवारी १७३८ (६६०).

**बाबुराव व्यंकटेश—रावसाहेब** (बाजीराव बल्लाळ) : अछरोणी येथील ऐवजाबाबत वाण्यास अटकाव, १२ सवाल/इ. स. १७२०-४० (८२२).

**भागोजी बलकवडे—पंत प्रधान***: डभई किल्याचा हिशेब रवाना, १४ ज.खर (७६०).

**भिवराव—राव*** : पत्रानुसार आज्ञेचा हुकूम, ६ रजब (७४६).

**भिवाजी तान्हाजी—रावजी** (बाजीराव बल्लाळ) : भंडारी जातीतील तंटा, इ. स. १७३४-३५ (८१३).

**मल्हार दादाजी—पंत प्रधान*** : रामभट ब्रह्मे व संध्याभट यांची रवानगी, १४ सवाल (७२३).

**मल्हार भास्कर—पंत प्रधान*** : येदलाबाद व यावल येथे धामधूम आणि बऱ्हाणपूर येथील हुंडीची शत्रूंकडून लूट, ७ जिल्हेज (८२४).

**मल्हारजी होळकर—आप्पा*** : व्याजाबाबत कबुली, भाद्र. व. ५, श. १६६७/५ सप्टेंबर १७४५ (७०२) ; **—आप्पासाहेब व पंतप्रधान** ( चिमाजी व बाजीराव बल्लाळ): शिवाजी नलगे व जनाजी वागदरे यांजकडून चाकरी, श्रावण शु. १५, श. १६६०/१९ जुलै १७३८ (८१९) ; दस्तकांची मागणी, आश्विन कृष्ण ७, श. १६५५/१८ ऑक्टोबर १७३३ (८२१) ; **—आप्पासाहेब** (चिमाजी बल्लाळ): घोडी रवाना, आश्विन कृष्ण १,श. १६५५/१२ आक्टोबर १७३३ (८२०).

**महादजी घाटगे—बाजीराव (बल्लाळ) पंडित** : केदारजी घाटगे याची रवानगी, इ. स. १७२०-४० (७२४); कृपालोभाची विनंती, इ. स. १७२०-४० (७२६).

---

*मूळ नावांची निश्चिती नाही.

## दप्तर क्रमांक २, पुडके क्रमांक १—चालू

पत्रे—चालू

**यशवंत पवार—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : सरकारी ऐवज रवाना, २२ रमजान/इ. सं. १७२०-४० (७०६).

**रखमाजी काकडे—पंतप्रधान** (बाजीराव बल्लाळ) : तांदूळ रवाना, १६ मोहरम, सु. ११३०/१ ऑगस्ट १७२९ (७५५).

**रघुराम शिवराम—आप्पा** (चिमाजी बल्लाळ): नबाबाच्या परवान्याची पोंच, फाल्गुन व. १४/इ. स. १७२०-४० (६६१); शंकराजी निकम याजकडे ऐवज रवाना, माघ शु. १०, श. १६६०/७ फेब्रुवारी १७३९ (६६३); मोहिमेची फत्ते, शंकराजी निकम व कृष्ण महादेव यांना द्यावयाचा ऐवज, पौष व. १०, श. १६६०/२३ जानेवारी १७३९ (६६४); यादो त्रिंबक याजकडून ऐवजाची आवक व बादशहाच्या आक्रमणाने सावकारांमध्ये घबराट, वैशाख शु. ८/इ. स. १७२०-४० (६६५); जमेचा ऐवज शंकराजी निकम याजकडे रवाना, चैत्र शु. ५, श. १६६०/१४ मार्च १७३८ (६६६); यार महंमद रोहिला व वासुदेव जोशी याजकडील ऐवजाची पोंच, ज्येष्ठ शु. १३/इ. स. १७२०-४० (६६७); हस्तिनापूरच्या दंग्याने ऐवज मिळण्यास विलंब व ताम्राच्या पुत्राचे खजिन्यासह हैद्राबादेहून आगमन, वैशाख शु. ६, श. १६५९/२४ एप्रिल १७३७ (६६८).

**राजसबाई पाटणकर—पंत प्रधान*** : हिरोजी पाटणकर याचा दंगा व वतनास उपद्रव (७७०).

**रामचंद्र गंगाधर—चिमणाजीपंत व बाजीराव** (चिमणाजी व बाजीराव बल्लाळ) : नाईकजी कडू याजकडून आनंदराव सोमवंशी यास हत्ती, कार्तिक व. ३/इ. स. १७२०-४० (७९९).

**रामचंद्र महादेव—चिमणाजी** (चिमाजी बल्लाळ) : खानदेश येथील सरदेशमुखीच्या ऐवजात गाजीभाई जवारी याजकडील यावयाचा ऐवज, खानदेश व जुन्नर येथील कमाविसदारांशी भेट, आषाढ व. १, श. १६५८/१२ जुलै १७३६ (६७३); —पंतप्रधान* : रामाजी शंकर याजकडून साद्यंत वर्तमान कळेल म्हणून, आषाढ शु. ३ (८०१).

**रामराव—पंत प्रधान** (बाळाजी बाजीराव): श्रीरंगपट्टण येथील ब्राह्मणांची इनामें, २ रजब, सु. ११५४/२६ एप्रिल १७५४ (७५८).

**रामाजी पवार—पंत प्रधान*** : चिंचोडीकर माळ्याच्या खुनाची चौकशी, ५ सवाल (७९०).

**राणोजी शिंदे—लक्ष्मण राम** : माळव्यातील ऐवजाची व्यवस्था, ९ जिल्हेज (७१२).

**रायाजी रामाजी—आप्पा*** : रायाजी रामाजी याजकडून आप्पाकडे कागदपत्रें रवाना, २० जिलकाद (७०१).

**रुपसिंग भोसले—पंत प्रधान** (माधवराव बल्लाळ) : मदनसिंग याचा मृत्यू, ज्येष्ठ शु. १, श. १६८४/२४ मे १७६२ (८०२).

**रंगो त्रिंबक—राव*** : अगडगाव व पिंपलगाव मोकासा अंमलाची पत्रें, (८१८).

**लक्ष्मण राम—पंत प्रधान*** : भेटीस येण्याचा विचार, पैठण येथील मामलतीचा हिशेब, ६ र. खर (७३३).

**लक्ष्मण हरि—रावजी*** : जिन्नस रवाना, (७४२).

**लाडोजी ढमढेरे—आप्पा*** : काशीबाई शितोळे हिस द्यावयाचा ऐवज, ज्येष्ठ व. ७ (७०५).

**वासुदेव जोशी—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : नगारे रवाना, २७ जिल्हेज/इ. स. १७२०-४० (७१५); सुभानजी येरुणकराचा उपद्रव, १४ जिल्हेज/इ. स. १७२०-४० (८०४); सात महालांच्या जमाबंदी, पौ ९ साबान, सु. ११३४/२४ जानेवारी १७३४ (८१६).

**विठ्ठल केशव—पंत प्रधान*** : नारोजी व रामजी कडू यांचा तंटा, प्रांतातील धामधूम कमी प्रमाणात, आश्विन शु. ११ (७९१).

**विठोजी घाटगे—रावप्रधान*** : उर्जित करून देण्याबद्दल विनंती, ३० सवाल (७६८).

**विठोबा नाईक—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : खासगत व मल्हारजी होळकर यांचा ऐवज, इ. स. १७२०-४० (६६२).

**विष्णु गणेश—पंत प्रधान*** : पौड येथील देहझाडे रवाना (७५७).

*मूळ नावांची निश्चिती नाही.

**पत्रे—चालू**

**व्यंकाजी शिवदेव—पंत प्रधान***: गावास दिलेली भेट, (७३५).

**शंकराजी केशव—पंत प्रधान***: सुरण रवाना, २० सफर (७३८).

**शिवराम कृष्ण—**आप्पा (चिमाजी बल्लाळ): भगवंत भैरव याजकडील हुंड्यांची पारख, आर्थिक हलाखी, मार्ग. शु. १, श. १६५८/५ डिसेंबर १७३६ (६७०); सावकारी ऐवज रवाना, पौष व. १४/इ. स. १७२०-४० (६७१); भोपाळ येथील ऐवज रवाना, वैशाख व. ११/इ. स. १७२०-४० (६७२); औरंगाबाद येथे आर्थिक हलाखी, मार्ग. व. ५, श. १६५६/४ डिसेंबर १७३४ (७१३).

**शिवराम रामचंद्र—बाजीराव (बल्लाळ) प्रधान**: उर्जित करण्यासाठी विनंती, इ. स. १७२०-४० (८११).

**सटवोजी जाधव—पंत प्रधान***: भेटीसाठीं आगमन, २ मोहरम (७३७).

**सावित्री निंबाळकर—प्रधान***: काशीयात्रेच्या मार्गाच्या दस्तकांची मागणी, कार्तिक शु. ३ (७९३).

**सूर्याजी नारायण—**पंत प्रधान (बाजीराव बल्लाळ): कोंबड्या रवाना, इ. स. १७३३-३४ (७५६).

**सेटयाजी सूळ—बाजीराव बल्लाळ**: माधवराव दिवाण याच्याशी भेट, इ. स. १७२०-४० (७६६).

**संभाजी व आवजी—रावसाहेब***: जासुदांस द्यावयाचा ऐवज, (७४३).

**संताजी जाधव—पंत प्रधान***: गांडापूर व वाळुंज येथील सरदेशमुखीच्या ऐवजाबाबतचे आप्पाजी माणकेश्वर यास द्यावयाचे पत्र, पौ १५ रमजान (७८६).

**संभाजी सोमवंशी—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ): लाकूड रवाना, सु. ११३४/इ. स. १७३३-३४ (७७३).

**(फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं)**

(–)—**आप्पा** (चिमाजी बल्लाळ): लोकांचे व दिवाण यांचे कर्ज, २२ सवाल, सु. ११३८/१ फेब्रुवारी १७३८ (६९३); नारोबा नाईक यास द्यावयाचा ऐवज, २२ सवाल/इ. स. १७२०-४० (६९४); ऐवज रवाना व वाड्यांतील लोक आणि बसवंतराव यांना द्यावयाचा ऐवज, २२ सवाल/इ. स. १७२०-४० (६९५); ऐवज लष्करांत रवाना, पौ १६ राखर, सु. ११३९/२३ जुलै १७३८ (६९६); महालांत द्यावयाचा ऐवज, पौ ३० सफर/इ. स. १७२९-४० (६९७); ऐवजाबाबत, जाब, इ. स. १७२०-४० (७०७).

(–)—**पंत प्रधान***: संक्रमणाचे तिळांची पोंच, पौ २९ मोहरम (७१६); गोपाळपूर येथील पत्रें रवाना, पौ ३० र. वल (७१७); बांधकामाचे लाकडांची मागणी, पौ १० रमजान (७३९); पिलाजी जाधव याच्या मागण्या मान्य करून त्यांच्याशी अंताजीपंत व जमीनदार यांची भेट, (७६१); मालमोजणी, (७६२); लष्करच्या रहदारीने रस्त्यांची खराबी, (७६३); जिनसांची कमतरता, (७७७); जिल्ह्याकडील कमाविशी भगवंतराव यांजकडे देण्यास जगताप यांची हरकत, (७८८); शंकराजी गणेश यास आमंत्रण, पौ ३० जिल्काद (७८९); कृष्णराव वाडे यांचे जवार प्रांती आगमन, (८०५); बाणकोट येथे तांदूळ रवाना, (८०६); परगण्यांवर अंमल राखण्यासाठी कमाविसदाराची नेमणूक करण्याबाबत निवेदन, (८०७); शंकराजी मेघःशाम याजकडून औषधोपचार करवून घ्यावा म्हणून, पौ १२ र. वल (८०९); गणेश शामराज यास द्यावयाचा ऐवज, पौ ८ रमजान (८२३).

(–)—**बाजीराव प्रधान**: निजामुद्दीअलीखान याजकडील पत्रें रवाना, २१ मोहरम (७५३); उत्सवाची बेगमी, (८१२).

(–)—**रावसाहेब***: कृष्णाजी नाईक याच्या हुंड्या रवाना (६५७).

(–)—**श्रीमंत***: बापूजी नारायण याच्या उर्जिताबद्दल विनंती (७६४).

**(प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली)**

ऐवज रवाना, (७१०); निजामअली याचेशी भेट, २१ ज. खर, सु. ११६१/३० डिसेंबर १७६० (७११); सकोजी बायाल यास द्यावयाचा ऐवज, (७६५).

*मूळ नावांची निश्चिती नाही.

## दप्तर क्रमांक २—चालू

### पुडके क्रमांक २

### का. सं. १६८ (८२७-९९४), सु. स. ११२१-११७२, इ. स. १७२०-१७७१

पत्रे :—

**आवजी कवडे—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : तुकोपंत याचे आगमन, ११ र. खर/इ. स. १७२०-४० (९५२); लष्करांतून गोसाव्याने चोरलेला उंट व घोडा यांचा शोध, ११ र. खर, सु. ११३९/१८ जुलै १७३८ (९१२).

**अंबिकाबाई जाधव—चिमाजी आप्पा** : मकरसंक्रमणाच्या तिळांची पोंच, इ. स. १७२०-४० (८३८).

**अंताजी नारायण—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : कल्याण-भिवंडी येथील रसदेची ऐवज वसुली, १८ र. खर, सु. ११३९ २५ जुलै १७३८ (९०२).

**काशीबा थोरात—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : राऊतांचे आगमन, २१ जिल्हेज/इ. स. १७२०-४० (८२७).

**कान्होजी माणकर—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : अंताजी कृष्ण याजबरोबर पाठविलेला ऐवज साष्टीस रवाना २९ जिल्हेज/इ. स. १७३९-४० (९६०).

**कृष्णराव महादेव—चिमाजीपंत** (चिमाजी बल्लाळ) : होळकर व चासकर यांचे घरकामाच्या लाकडांबाबत भांडण श्रावण व. ८/इ. स. १७२०-४० (८४८); अंताजी रघुनाथ व दत्ताजी यांच्या कबिल्यांची रवानगी इ. स. १७२०-४० (९२२); घर बांधण्यास लाकडांची मागणी, आश्विन शु. ३/इ. स. १७२०-४० (८४७), शहरात (औरंगाबादेस) वास्तव्य झाल्याकारणाने मुलामाणसांचा सांभाळ करण्याची विनंती, २४ रजब/इ. स. १७२०-४० (९७८); सनदेवरून गांवकऱ्यांकडे जमिनीची मागणी व गोविंद कृष्ण यांच्याशी सौरस्य, अधिक ज्येष्ठ शु. ३, श. १६५८/२ मे १७३६ (९६४).

**कृष्णाजी शिवदेव—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : कल्याण येथे बैल रवाना, १० मोहरम/इ. स. १७२०-४० (९२१); वसई येथे भात रवाना, २७ जिल्हेज/इ. स. १७२०-४० (९१९); ५ मोहरम/इ. स. १७२०-४० (९२०); कोठीकडील बैल आजारी म्हणून पाठविण्यासाठी बैलांची कमतरता, २५ जिल्हेज/इ. स. १७२०-४० (९१८); कोठीच्या बैलांसंबंधी चौकशी, रोजमुऱ्याच्या ऐवजाची मागणी, १७ जिल्हेज/इ. स. १७२०-४० (९१७).

**कृष्णाजी दादाजी—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : रामाजी याची रवानगी व त्यास चाकरी देण्याबद्दल विनंती, श्रावण व. ३/इ. स. १७२०-४० (९५३).

**कृष्णाजी अनंत—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : पंतप्रधानांचे (बाजीराव बल्लाळ) हिंदुस्थानांत व बाईचे वाराणसीस गमन, ११ जिलकाद, सु. ११३६/१४ मार्च १७३६ (९४३).

**कृष्णाजी कदम—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : कंठापूर व लोहगड येथून गल्ला मिळण्यासाठीं वरातांची मागणी २६ ज. वल/इ. स. १७२०-४० (९१५).

**केचोजी हणंगभर—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : घनगड येथे पेठाहून मीठ आणून देण्याबाबत कमाविसदारास पत्राची मागणी, २० जिल्हेज/इ. स. १७२०-४० (९०७); चवेणीची पानें रवाना, इ. स. १७२०-४० (९०८).

**केसो कृष्ण—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : मकबूल आलम याजकडून वतनाचा बंदोबस्त, ३ सवाल/इ. स. १७२०-४० (९१३).

**केशव सजणाजी—आप्पासाहेब** (चिमाजी बल्लाळ) : खाद्याची रवानगी, १० मोहरम/इ. स. १७२०-४० (९००).

**केशवराव महादेव—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : कडूसमधील हजीज बरक जमातदार यास दारुगोळा वगैरें सरंजामाचा पुरवठा, कार्तिक बहुल १०/इ. स. १७२०-४० (९७१); कडूस ठाण्यांतील बरकंदाजांची रवानगी, मार्गशीर्ष/इ. स. १७२०-४० (९७२).

**केशरसिंगजी—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : रामनगरला आगमन, इ. स. १७२०-४० (८३२).

**कोंडाजी यादव—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : उसन्या दिलेल्या भाताचा वसूल, इ. स. १७२०-४० (९७५).

*मूळ नांवांची निश्चिती नाही.

**पत्रे—चालू**

**गणेश बल्लाळ—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : बहादुरपूर येथें आगमन व दादासाहेब यांची भेट, इ. स. १७२०-४० (८३३).

**गुरुभक्ती सहजपूर—चिमणाजी बल्लाळ** : अतिथींचा खर्च चालवण्याबद्दल विनंती, इ. स. १७२०-४० (९६३).

**गोविंद हरि—आप्पासाहेब** (चिमाजी बल्लाळ) : कृष्णाजी कदम यांस कंठापूर व लोहगडावर गल्याच्या वराता देण्याची मागणी, २६ ज. वल/इ. स. १७२०-४० (९१६).

**गोविंद त्रिंबक—अंताजीपंत** : गोविंदराव देशमुख नेवासकर यांचा परामर्ष, मोगलाई दसुलास अडथळे, इ. स. १७२०-४० (९१४).

**गोविंद अनंत—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : वरातांच्या ऐवजासंबंधी विठ्ठलपंत याची तसदी, इ. स. १७३३-३४ (९६८).

**गोपाळ भास्कर—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : घोडयाच्या शिंगराची जोपासना, १४ जिल्हेज/इ. स. १७२०-४० (८३५).

**गोपीनाथ—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : जयसिंगपुराभोवती चौक्या बसल्यामुळे रयतेचे हाल होतात त्याचा बंदोबस्त, इ. स. १७२०-४० (९८३).

**गंगाधर नरसिंह—महादजीपंत व राघोपंत** : कुशल समाचार, १ मोहरम/इ. स. १७२०-४० (८७४).

**गंगाजी कोकरे—आप्पासाहेब** (चिमाजी बल्लाळ) : वतनाच्या मोकळिकीची मागणी, इ. स. १७२०-४० (८३९).

**चिमणाजी बल्लाळ—बाबुराव राम** : हिरोजीराव पाटणकर यांस नेमणुकीचा ऐवज देणे, पौ ८ सवाल/इ. स. १७२०-४० (९२८) ; रामजी जगताप व गांवगन्नाचे पाटील कुलकर्णी यांना खंडणी ठरविण्यासाठी बोलावणे, १९ जिल्काद/इ. स. १७२०-४० (९२९) ; **—नाना** (नानासाहेब) : विक्रम पतंगराव यास शिवराम कृष्ण याजकडून रहाण्यासाठीं घर देण्याची सोय, १९ सफर, सु. ११३९/१७ मे १७३९ (९३०).

**चिमणाजी शिवदेव—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : पंतप्रधान येईतोपर्यन्त नारो दामोदर यांस ठेवून घेण्याबद्दल विनंती, १८ जिल्हेज/इ. स. १७२०-४० (८४०).

**चिमणाजी भीमराव—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : दादाभाई व काऊसजीभाई यांना दिलेल्या वचनाप्रमाणे त्यांचे काम करून देण्याची विनंती, १४ जिल्हेज/इ. स. १७३९-४० (९४५) ; कुशलाची विचारणा, ११ मोहरम/इ. स. १७२०-४० (८४६).

**जगन्नाथ कचेश्वर—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : शंकराजी मंबाजी याचा परामर्ष, इ. स. १७२०-४० (९८४).

**जनकोजी शिंदे—आप्पासाहेब** (चिमाजी बल्लाळ) : कंठापुराहून गल्ला मिळण्यासाठीं सनदेची मागणी, मार्ग. शु. ७/इ. स. १७२०-४० (८८९).

**जनार्दन—बाबुराव** : विहिरीचे बांधकाम, चैत्र शु. ९, श. १६५५/१३ मार्च १७३३ (८७५).

**जनाई जगताप—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : संताजी मोरे याजकडे सुभानजी जगताप याची चाकरी व घरखर्चाच्या सोयीबद्दल विनंती, चैत्र शु. ७/इ. स. १७२०-४० (९५९).

**जानोजी भोईटे—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : गूळ रवाना, इ. स. १७२०-४० (९५१).

**जिवाजी बाजी—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : कुलाब्याहून आणण्याच्या मिठाच्या दस्तकाची मागणी, इ. स. १७२०-४० (९०३).

**जिवाजी ढमढेरे—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : मातुश्रींचे दुखणे, १६ जिल्हेज/इ. स. १७३९-४० (९४०).

**जिवाजी हरि—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : ऐवज पावल्याची विचारणा, ११ मोहरम/इ. स. १७२०-४० (८४४).

**जिवाजी व्यंकाजी—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : बसवलिंगप्पा याचे भेटीसाठीं आगमन, माघ बहुल २, श. १६५८/६ फेब्रुवारी १७३७ (९७६).

**जिवाजी गणेश—आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : वेणुराव यादव याजकडून आलेल्या दारुची पोंच, १७ सफर/इ. स. १७२०-४० (९५७).

**पत्रे**—चालू

**तुळाजी शितोळे--आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : तिळगुळाची पोंच, १२ सवाल/इ. स. १७२०-४० (८४३).

**तुंबाजी अनंत--आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : म्हालोजी मुठे याच्या पथकास देण्यासाठीं मल्हारपंत याच्याजवळ ऐवजाची टंचाई व शंकराजी कडू व घाटगे यांच्या पथकास परत बोलावणी, २७ मोहरम/इ. स. १७२०-४० (९५४).

**त्रिंबकराव धायगुडे--चिमणाजी आप्पा** : तिळगुळाची पोंच, ७ सवाल/इ. स. १७२०-४० (९३९).

**त्रिंबकजी इंगळे--आप्पा** (चिमाजी बल्लाळ): सुभानजीराव अधिकार यांच्या गांवास सूर्याजी नारायण याची तसदी, चैत्र व. ५/इ. स. १७२०-४० (९६२).

**दत्तो नागनाथ--आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : औषधांची पोंच, माघ व. १२, श. १६५५/१९ फेब्रुवारी १७३४ (९८१).

**दत्तो जगन्नाथ--आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : स्वामींचे आगमन परंतु भेद झाला तर गोष्टी विसकटण्याचा संभव माघ शु. ३/इ. स. १७२०-४० (८४१).

**दादाजीराव नरगुंद--चिमाजीराव आप्पा** : पाठविलेल्या वस्त्रांची पोंच, पौ ११ र. खर/इ. स. १७२०-४० (८९१).

**दादाजी शामजी--रामजी** : चिरंजीव जखमी झाल्यामुळे रजेची विनंती, (८७३).

**धोंडो केशव--आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : जिनसांची रवानगी व स्वारांस देण्यास रोजमुऱ्याची टंचाई, ९ सफर, सु. ११३९/७ मे १७३९ (९३६).

**नागोजीराम--आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : मुलाच्या लग्नासाठी ऐवजाचा बंदोबस्त, पौ ६ जिल्हेज/इ. स. १७२०-४० (८३६).

**नाना** (बाळाजी बाजीराव) — **आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : अंताजी शिवदेव आजारी म्हणून नारो शिवदेव याचेबरोबर आलेल्या अर्काट प्रांताच्या कागदपत्रांची पोंच, इ. स. १७२०-४० (८६२).

**नारायण जोशी--आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : वाघाटीच्या फळांची रवानगी, १७ मोहरम/इ. स. १७२०-४० (८६६) ; तलोडे येथे तांदुळाचा भरणा, ४ मोहरम/इ. स. १७२०-४० (९०१).

**नारायण दीक्षित--अंबाजीपंत** : शिवा गुरव यास इनाम न देण्याबद्दल विनंती, भाद्र. शु. १४/इ. स. १७२०-४० (९३५).

**नारो रुद्र तांबे--आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : सैन्यांत असलेल्या अंताजीपंत यांच्या कुटुंबियांचे पोषण, चैत्र व. ८, श. १६६१/२० एप्रिल १७३९ (८६७).

**नारो बाबाजी--आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : वरकंदाजांची रवानगी, पौष शु. १२/इ. स. १७२०-४० (८९५).

**नारो रघुनाथ--आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : सोनाराची रवानगी, ५ सफर/इ. स. १७२०-४० (९०५).

**नारो बल्लाळ--आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : कमाविशीसंबंधी कागदपत्रांची रवानगी, २२ ज.वल/इ. स. १७२०-४० (९५५).

**नारो शंकर--चिमणाजी पंडित** : सुधागड प्रांताहून आणलेल्या मालाच्या वासुदेव जोशी याने घेतलेल्या जकात वसुलीची मागणी, इ. स. १७२०-४० (८५४).

**निळो विठ्ठल--आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : घरच्या मंडळींचा परामर्ष व न्हावी गांवाच्या ऐवजाची वसुली, इ. स. १७२०-४० (८४२).

**निंबाजी सूर्यवंशी--आप्पा** (चिमाजी बल्लाळ) : क्षेम समाचार, २९ मोहरम/इ. स. १७२०-४० (९८०).

**पिलाजी जाधव--चिमाजीपंत** (चिमाजी बल्लाळ) : पिंजरीसाठीं लांकूड ओंड्याची मागणी, इ. स. १७२०-४० (८३०) ; अंताजी रघुनाथ वैद्य याजबरोबर औषधांची रवानगी, इ. स. १७२०-४० (८६०) ; बाजी कदम व शिवाजी मोरे यांच्या कबिल्यास रहाण्यासाठी जागेची सोय, इ. स. १७२०-४० (८८२) ; महंमदौलाखान यास कापडाचे दस्तक व भावसिंग टोके यास पत्र देण्याबद्दल विनंती, इ. स. १७२०-४० (८८३) ; कापडाची पोच, ६ सवाल/इ. स. १७२०-४० (८८४) ; धिराजी पवार यांजकडील राऊत व वरकंदाज यांच्याकडे ऐवजाची पावती, ७ रजब/इ. स. १७२०-४० (८८५) ; हाजी आसूद याच्या इनामास उपसर्ग देऊ नये म्हणून शंकराजी निकम यांच्या नांवे

**दप्तर क्रमांक २१—चालू**

**पुडके क्रमांक ५**

का. सं. ११४ (१२८७५-१२९८८), सु. स. ११६८-११९६, इ. स. १७६७-१७९५.

**पत्रे।**

**अनंतशास्त्री तेने—गोविंदपंत तात्या**: चिरकारी प्रांत डागाई येथून कौटुंबिक गोष्टीबाबतचे पत्र, भाद्रपद शु. ५ (१२९५८).

**आनंदराव धुळप—पंत प्रधान** (माधवराव नारायण): आज्ञेप्रमाणे आरमार घेवून साष्टीचे कुमकेस प्रयाण, २४ सवाल, सु. ११७५/२८ डिसें. १७७४ (**१२९०४**).

**आनंदराव राम—पंत प्रधान** (माधवराव नारायण): इंग्रजांच्या तोफा साष्टीस येऊ लागल्या नाहीत, यशस्वी लढयाकरितां हजार दीड हजार स्वारांची निकड, ११ सवाल, सु. ११७५/१५ डिसें. १७७४ (१२९७८).

**आप्पाजी गणेश—नाना** (नाना फडणीस): रसद भरणा करण्याची व्यवस्था करीत असल्याबाबत, गोविंदराव व फतेसिंग गायकवाड यांचेबाबत बातमीपत्र, ज्येष्ठ शु. १, श. १६९६/१० जून १७७४ (**१२९४०**).

**आप्पाजी पायगुडे—नाना** (नारो आनंदराव केसकर): भडोचहून इंग्रजांची युद्धसामुग्री येत आहे व दादांचा (रघुनाथ बाजीराव) मुक्काम झाडेश्वराजीक असल्याबाबत, ३० र. वल, बुधवार, सु. ११७५/३१ मे १७७५ (१२९१०).

**काशी रामाजी—रावसाहेब** (विश्वासराव लक्ष्मण): टहरोलीकरांच्या उपद्रवाने सागर व आसपासचे गाव उज्याड झाल्यामुळे मदतीची याचना, १३ जिल्हेज, सु. ११६८/१ मे १७६८ (**१२९४६**).

**काशी बल्लाळ—तात्या** (हरिपंत फडके): त्रिंबक किल्याचे जहागिरीची गावे श्रीमंतांचे मर्जीप्रमाणे आपणास देण्या-बाबत (**१२९५०**).

**कोनेर रघुनाथ—नारोपंत नाना**: सुरतेस चाललेल्या फौजेने पुणे येथील बागायत लुटल्याची तक्रार, इ. स. १७७४-७५ (**१२९१९**) ; सुरतेकडील इंग्रजांचे हालचालीबाबत विचारणा, पुण्याचा बंदोबस्त योग्य प्रकारे राखण्याची विनंती, १७ मोहरम/इ. स. १७७४-७५ (**१२९२०**).

**खंडेराव दरेकर—दादासाहेब** (रघुनाथ बाजीराव): आज्ञेप्रमाणे स्वार घेऊन नाशिक येथे प्रयाण, श्रावण व. १०/इ. स. १७७४-८० (**१२८८२**).

**खंडेराव पवार—दादासाहेब** (रघुनाथ बाजीराव): आज्ञेप्रमाणे कचनार सराईहून फौजेसह येत असल्याबद्दल (**१२९८०**).

**गणपतराव—पंत प्रधान** (माधवराव नारायण): दादासाहेबांना फितूर झालेल्या महादजी विश्वनाथ गोगटे यास जामीन राहिल्याबद्दल, १ र. वल, सु. ११७७/१० एप्रिल १७७७ (**१२९१५**).

**गणेश महादेव—रावसाहेब** (विश्वासराव लक्ष्मण): बिसनसिंग गुजर याची बाळाजी गोविंद व अनुपगीर गोसावी यांचेशी भेट व त्यांच्या उपद्रवकारक हालचाली, १५ जिलकाद, सु. ११६८/३ एप्रिल १७६८ (**१२९४५**) ; बिसनसिंग गुजर याचे संभाव्य हल्यापासून किल्ले मोटेचे रक्षण करण्याकरिता फौजेची मागणी, २१ सवाल/इ. स. १७६७-६८ (**१२९४७**)

**गोपाळ नाईक तांबवेकर—नारोपंत नाना**: पैशाची फार अडचण असल्याची तक्रार, कार्तिक व. १४, श. १६९६/२ डिसें. १७७४ (**१२९३४**).

**गोविंद सामराज—नाना** (नाना फडणीस): खिचीवर काढलेल्या वरात वसुलीसंबंधात केलेला करार तुकोजी होळकर पाळत नसल्याबाबत तक्रार, १४ र. खर (**१२८७५**).

**गोविंद वासुदेव—नाना***: कामेरज येथील भिल्ल व कोळी यांच्या दंग्याचा बंदोबस्त करण्याबाबत, ११ जिलकाद (**१२८८५**).

**गोविंद सदाशिव—नारोपंत नाना** (नारो आनंदराव केसकर): आज्ञेनुसार पिंपळनेरास येत असल्याबाबत, १ ज. वल/इ. स. १७७३-७५ (**१२८९३**) ; श्रीमंताच्या आज्ञेप्रमाणे फौजेसह खानदेश सोनगड मार्गे आपणाकडे येत असल्याबद्दल, इ. स. १७७४-७५ (**१२९६३**).

**गोविंद हरि—नारोपंत नाना**: मोल्हेर, डांग, सवदाणे येथील चिमणरावाचे उपसर्गास तोंड देण्याकरिता राऊतांची मागणी, ५ ज. खर/इ. स. १७७४-७५ (**१२८९५**).

---

*मूळ नावांची निश्चिती होत नाही.

पत्रे—चालू

**चांगोजी कदम—नारोपंत नाना** (नारो आनंदराव केसकर): दादांचा (रघुनाथ बाजीराव) मुक्काम खंबायतस असल्यामुळे तात्यांच्या आज्ञेप्रमाणे बडोद्यास वास्तव्य, १९ मोहरम/इ. स. १७७५-७६ (१२९४९).

**चिंतो नारायण—सुभेदार**: खानदेशात गोसावी यांचा दंगा चालू असल्याबाबत, इ. स. १७७४-९५ (१२९८४).

**जगन्नाथ नारायण—नाना***: किल्ले अशर येथे हुजूर लोकांची रवानगी, इ. स. १७७३-८३ (१२९७५).

**जिवाजी रघुनाथ—रावसाहेब***: नवाब कलबर्गे अवशास जाणार व त्याच मार्गे श्रीमंत जाणार असल्याबाबत, ७ जिल्हेज, सु. ११७४/१९ फेब्रु. १७७४ (१२९२९); धोंडोराम याचेसह रुकनुदौलाशी पुढील हालचालीबाबत बोलणे, नबाबाचे तुळजापूर मार्गे आगमन, १४ जिल्हेज, सु. ११७४/२६ फेब्रु. १७७४ (१२९३०).

**घोडो गोविंद—नारोपंत नाना**: चिमणराव देशमुखाच्या स्वाऱ्या, पैशाची चणचण वगैरे कारणामुळे भेटीस येता येत नसल्याबाबत, ३ ज. वल/इ. स. १७७३-७५ (१२८८६); कुकरमुंढे येथील बांडे, भिल्ल, साल्हेरकर व चिमणराव यांचे उपद्रवाचा बंदोबस्त राखण्याबाबत, आषाढ व. १, श. १६९७/ १३ जुलै १७७५ (१२९६२); —**पंत प्रधान** (माधवराव नारायण): पेशवाई पदाची वस्त्रे वैशाख व. ४ ला मिळाल्याबाबतचा आनंद व्यक्त, १ र. खर, सु. ११७५/११ जून १७७४ (१२९४३).

**नरसिंगराव बल्लाळ—बापू**: सेवली प्रांतात गिरजोजी आटोळे यांनी मवासांचे बंदोबस्ताकरिता चाकरी केल्याबाबत, इ. स. १७७४-७५ (१२९२४).

**नारो चिमणाजी—बाईसाहेब** (गंगाबाई): परगणे सावली प्रांत गुजराथ येथील दादासाहेबांच्या (रघुनाथ बाजीराव) विध्वंसक हालचाली, रसद भरणा कां करता येत नाही त्याची कारणे, २ ज. वल, खमस, सु. ११७५/ १२ जुलै १७७४ (१२८७८).

**नारो शामदेव—मोरोपंत दादा**: खंडेराव हरी याचा तोफखाना सुरंज परगण्यांत येत आहे त्याचा बंदोबस्त करण्याबाबत, २३ सवाल (१२९५७).

**नावजी ढमढेरे—विसाजीपंत**: माधवराव बांडे यांचेशी कसबे रनाले येथे झालेली चकमक व त्याचे तोरखेडचास पलायन, २६ र. वल/इ. स. १७७४-९५ (१२९३८).

**पुरुषोत्तम कृष्ण—हरिपंत तात्या**: त्रिंबकहून गंगापुरास आगमन, पुढे पुरंदर मुक्कामी जाण्याचा विचार, ३ र. खर/इ. स. १७७५-७७ (१२९८२).

**बखतराम—राघो शंकर**: चिमणराव देशमुखाचा सोनगड मुक्कामी बंदोबस्त करण्याकरिता इंग्रजांची मदत घेण्याबाबत, २९ सवाल/इ. स. १७७४-७५ (१२८७९).

**बहिरो रघुनाथ—नाना** (नाना फडणीस): नवसारीहून लहान तोफा पाठविण्याबाबत, जंबूसर इंग्रजांनी घेतल्याबाबत, ११ सफर, सु. ११७५/१२ एप्रिल १७७५ (१२९६५).

**बापूजी जनार्दन—पंत प्रधान** (माधवराव नारायण): सरकारी कागदपत्र व हुंड्या अनाधिकाराने स्वत:जवळ ठेवून घेतल्याबद्दल झालेल्या गुन्हेगारीची भरपाई व स्वामीनिष्ठेची शपथ, २७ र. खर, सु. ११७६/ २६ जून १७७५ (१२८८८).

**बापूजी कृष्ण—नारोपंत नाना**: सरभुवन येथील आपणास दिलेली सनद योग्य असल्याचा दावा व त्याचा न्याय करण्याची विनंती (१२९२६).

**बाळाजी नारायण—पंत प्रधान** (माधवराव नारायण): बाजी जोशी पालवणकर यास जामीन राहिल्याबाबत, ११ ज. वल, सु. ११८०/१६ मे. १७८० (१२९२१).

**बाळाजी रघुनाथ—नाना** (नाना फडणीस): नर्मदातीरावरून पुढे जाताना आपल्या फौजेपासून आमचे गावास उपद्रव होऊ न देण्याची खबरदारी घेण्याची विनंती, १४ जिलकाद, सु. ११७५/१७ जाने. १७७५ (१२९३२).

*मूळ नावांची निश्चिती होत नाही.

पत्रे---चालू

**बाळाजी येमाजी---नारोपंतनाना** (नारो आनंदराव): दादांचा (रघुनाथ बाजीराव) बेटावद, खानदेश येथे मुक्काम, गोविंदराव गायकवाड याची श्रीमंतांशी भेट होऊं न देण्याची खबरदारी, नरोत्तम किशोरदास यांच्या बंदोबस्ताची योजना, फौजेची जमवाजमव, मार्गशीर्ष व. ५, श. १६९६/२३ डिसें. १७७४ (**१२९३७**) ; रेवातीरास येण्याची विनंती, नाना व बापू यांची फौज अंमळनेरावर आल्याची आवई, कोंडाईबारी नजीक लष्करातील जेष्ठ सरदारास मुक्काम करण्याची आज्ञा, शिंदे, होळकर व हरिपंत हे तिघे दादांच्या मागावर, मार्गशिर्ष व. १, श. १६९६/१८ डिसें. १७७४ (**१२९६४**).

**भगवंतराव---तात्या** (हरिपंत फडके): श्रीमंताचे (सवाई माधवराव) जन्मानंतर हार्दिक प्रगटन, २५ र. वल, सु. ११७५/६ जून १७७४ (**१२९०१**).

**महिपतराव घोरपडे---लक्ष्मणपंत देशमुख** : इंग्रजांची व तात्यांची लढाई झाली त्यात जखमी झालेल्या लोकास दुसऱ्या जागेत हलविण्याबाबत, चैत्र व. १५ (**१२९०५**).

**मल्हार आनंदराव---रघुपतरावभाऊ** : गोपाळराव बर्वे यांचा रणोद्यास मुक्काम असल्याबाबत, (**१२९५९**).

**माधवराव नारायण---नारो महादेव** : नरोत्तम किशोरदास यास त्रिंबक येथे अटकेत ठेवण्याबाबत, ४ जिलकाद, सु. ११७५/७ जाने. १७७५ (**१२९०७**) ;---**लक्ष्मण हरी गोसावी** : किल्याचे बेगमीकरिता नेरल येथील भात कापण्याची आज्ञा, सु. ११९१/इ. स. १७९०-९१ (**१२९८३**) ;---**नारो आनंदराव** : मुंबईकर इंग्रज व सुरतकर मोगल यांनी सरकारच्या तहात अंतर करून कोणती गैरवर्तणूक केली त्याबाबत, सु. ११७५/इ. स. १७७४-७५ (**१२९८८**) ;---**गणेश बल्लाळ** : इंग्रजांच्या संभाव्य लुटीपासून वाचविण्याकरिता उंदेरीचे आजुबाजूस असलेले भात त्वरेने किल्यात जमा करण्याबाबत, सु. ११८१/इ. स. १७८०-८१ (**१२९१२**).

**माधवराव बल्लाळ---गोपाळराव गणेश** : संस्थान गढेमंढले व पा रेवा मुकुंदपूर येथील कमाविस अमलाची सनद (भोसले याचा अंमल सोडून) दिल्याबाबत, सु. ११७३/इ. स. १७७२-७३ (**१२९३१**) ;---**शिवाजी नीळकंठ** : राघो विठ्ठल व गणेश विठ्ठल याच्या मुलामाणसास नगरमध्ये उपसर्ग लागणार नाही याची खबरदारी घेण्याबाबत, २१ ज. वल, सु. ११६८/१५ ऑक्टो. १७६७ (**१२९७९**).

**मालोजी राजे घोरपडे---हरीपंततात्या** : युद्धकाळचे समई इनाम गाव देणार याबाबत दिलेल्या आश्वासनाचे स्मरण पत्र, कार्तिक व. १/इ. स. १७७३-८३ (**१२९२५**).

**मावजी नाईक---नाना** (नाना फडणीस) : आज्ञेप्रमाणे विंचूर येथून पुढे रवाना परंतु साहित्याची अडचण असल्याबाबत तक्रार, इ. स. १७७३-८३ (**१२८८७**).

**रंगो गणेश---गोविंदपंत** : गुलजारखान टोके याचे आनंदीबाईसी सूत्र व त्याचा प्रांतातील अन्वनित उच्छाद, इ. स. १७७४-७५ (**१२९५२**).

**रंगो खंडेराव---नाना** (नाना फडणीस) : नारो कृष्ण यास करून द्यावयाच्या नेमणुकीबाबत, २८ सफर/इ. स. १७७६-७७ (**१२९५६**).

**लक्ष्मण गोविंद---नारोपंतनाना** (नारो आनंदराव केसकर) : वेंकाजीशी विचारविनियम करून तात्यांचे लष्करापर्यंत डाक बसविण्याची विनंती, तात्या खानदेशात येणार असल्याबाबत बातमी, ९ ज. वल, सु. ११७६/८ जुलै १७७५ (**१२९३५**).

**विठोबा---मामा** : त्रिंबकपंत धारप या फितुराच्या हालचालीचा संपूर्ण तपशील मुंबई उरण वगैरे गावास गेला होता त्याबद्दल, इ. स. १७७४-७५ (**१२९७६**).

**विश्वासराव लक्ष्मण---यादोराव हरी** : किले करेरा वगैरे ठाणी रघुनाथ हरी याजकडे ताबडतोब देण्याचा हुकूम, १० रमजान, सु. ११७१/२८ डिसें. १७७० (**१२९२८**).

**व्यंकाजी यशवंत---नाना** (नाना फडणीस) : हरिपंत तात्यास व तुम्हास नवापूर मुक्कामी आलेली पत्रे सोनगडास रवाना केली, ७ र. खर, गुरुवार, सु. ११७६/८ जून १७७५ (**१२९६६**).

**व्यंकाजी माणकेश्वर--- बज्याबा** : कामटी ता। खेडबारे येथील वसूल तुकोपंत बावाने तुमचेकडे द्यावा म्हणून सूचना, कऱ्हाड प्रांतास प्रतिनिधींचा उपद्रव, आमचा उपद्रव नाही, २८ साबान (**१२९७१**).

पत्रे—चालू

**शंकराजी खंडेराव—नारोपंत नाना** (नारो आनंदराव केसकर) : नवापूरचे बातमीपत्र पाठविण्याची व्यवस्था करीत असल्याबाबत, आश्विन व. १०/इ. स. १७७३-७५ (१२८९१) ; तापी उतरून स्वतः भेटीस येत असल्याबाबत, इ. स. १७७४-७५ (१२८९६) ; दादांची (रघुनाथ बाजीराव) बाबापीराचे घाटाचे आसपासची हालचाल, फत्तेसिंग व गोविंदराव गायकवाड यांची पैठणवरील हालचाल, ११ रमजान, सु. ११७६/५ ऑक्टो. १७७५ (१२९३६).

**शंकराजी केशव—जनार्दनपंत** : खंबाईतकर मोगलांशी जंबुसर शहरी लढाई व अटीतटीचा सामना, वसईस ऐवजाची दुरावस्था, २६ ज. वल (१२९७७).

**श्रीनिवास त्रिंबक—तात्यासाहेब*** : शंकराजी खंडेराव याने नवापुऱ्यास दादासाहेबांकडील हेर पकडल्याबाबत, ७ सवाल/इ. स. १७७४-७५ (१२९१८).

**श्रीपतराव त्रिंबक—नारोपंत नाना** : त्रिंबकजी गायकवाड यास सुरत आठविसीचा सुभा देण्याबाबत नाना व बापुंचे निखालसीचे पत्र (१२९५४).

**सखाराम भगवंत—रघुनाथपंत** : जालनापूर नजिक फौजेसह आलेल्या चिमणाजी भोसले व शंकराजी घोरपडे याची दखल, इ. स. १७७४-७५ (१२८७६).

**सदाशिव हरी—बाईसाहेब** (गंगाबाई) : साबाजी व मुधोजी यांच्या परभणी परगण्यावरील हल्ल्यामुळे रसद भरणा करता येत नसल्याबाबत, २६ र. वल, खमस, सु. ११७५/२७ मे १७७५ (१२८७७).

**सदाशिव अनंत—लक्ष्मणपंत दादा देशमुख** : दादांशी (रघुनाथराव) रेवा उत्तरतीरावर झालेली चकमक, इंग्रजांची भडोच येथील हालचाल, सोनगडमार्गे मालेगांव येथे आगमन, २८ र. खर, सु. ११७६/२७ जून १७७५ (१२९११).

**सुखानंद अतमाराम—नाना** (नाना फडणीस) : आज्ञेप्रमाणे मीस्तर या इंग्रज चाकराची बेगमी करता येत नसल्याबाबत दिलगीरी, चैत्र व. १२/इ. स. १७७४-७५ (१२९२३) ; मिस्तर चामर याजजवळ आज्ञेप्रमाणे सरंजाम देत असल्याबाबत, चैत्र व. १४, बुधवार/इ. स. १७७४-७६ (१२९३९).

**संताजी लांभाते—नाना फडणीस** : आज्ञेप्रमाणे पुरंदरास येत असल्याबाबत, इ. स. १७७३-७५ (१२९४१).

**हरी बल्लाळ व विसाजी केशव—नारोपंत नाना** : मुल्हेर येथील भिल्ल व मेहरकरांचा उपद्रव थांबविण्याची विनंती, श्रावण शु. १/इ. स. १७७४-७५ (१२९३३).

**(फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली)**

**आप्पाजी विश्वनाथ—(—)** : रनाले व तोरखेड ही ठाणी बांडांना परत द्यावयाची ठरल्यास तेथील तोफा माघारे नेण्याबाबत विनंती, १३ रमजान, सु. ११७८/१६ ऑक्टो. १७७७ (१२९५५).

**केशव कृष्ण—(—)** : राजेरीस इंग्रजाची माणसे उतरली किंवा नाही याबाबतची शहानिशा, २८ मोहरम/इ. स. १७७३-८३ (१२९७४)).

**गणेश हरी—(—)** : फत्तेसिंगास ताळ्यावर आणण्याकरिता कडक उपाययोजना करण्याची आज्ञा, पा। १२ र. खर, सु. ११७७/२० मे १७७७ (१२८९७).

**गणोजी रामचंद्र मोरे—(—)** : होळकराकडील बातमीदार संताजी कोळी इंग्रजांकडे गेला होता तो परत येत असल्याबाबत, इ. स. १७७३-८३ (१२९०८).

**गोपाळकृष्ण—(—)** : गोविंदराव गायकवाड भवानजी पाटील यास निरोपाची वस्त्रे दिल्याबाबतचा दाखला पाठवित असल्याबद्दल, १७ ज. वल, सु. ११८१/१२ मे १७८१ (१२९६९).

**गोविंद गंगाधर व बाळाजी महादेव—(—)** : बापूजी हरी पाटणकर याजबरोबर पाठविलेली हशम व गारदी पारसीक मुक्कामी पोहोचले, इंग्रजांचा जोर फार आहे म्हणून, १८ सवाल, सु. ११७५/२२ डिसें. १७७४ (१२९८५).

**जनार्दन अनंत—(—)** : बडोद्यास लढाईचे वर्तमान गेल्यावरून मांडवी मुक्कामी आमंत्रण, श्रीमंताचा नर्मदातीरी मालसिनोरे येथे फौजेसह मुक्काम, श्रीं चे बडोद्यास आगमन होण्याची वार्ता, २३ रजब, सु. ११७६/१९ सप्टें. १७७५ (१२९८६).

*मूळ नावाची निश्चिती नाही.

**पत्रे—चालू**

**जानो बाबुराव दिवाडकर—(—)** : इंग्रजांकडील करार करून आलेल्या वकीलाशी भेट होणार असल्याची वदंता, राघोबादादांस सोळालक्षाची जहागिरी देण्याबाबत करार, माघ शु. १/इ. स. १७७५-८० (१२९६१).

**त्रिंबकराव—(—)** : इंग्रज व गायकवाड यांचा देवली भवानीजवळील मुक्कामाबाबत बातमीपत्र, ९ सफर/इ. स. १७७४-७५ (१२९०६).

**त्रिंबक विश्वनाथ—(—)** : श्रीमंतांचे धारेवरून मौजे पेठ प्रा॥ मालवा मुक्कामी आगमन, ७ जिलकाद (१२९८७).

**त्रिंबक सूर्याजी—(—)** : इंग्रजांकडील बातमीकरितां माणसांची रवानगी केल्याबाबत, इ. स. १७७४-७५ (१२९१४).

**नाईकजी तुपे—(—)** : मकडाई किल्यावर केलेल्या चढाईचा तपशील (१२९०३).

**बळवंतराव नागनाथ—(—)** : पाटीलबावा व इस्माइलबेग यांची लढाई झाल्याबाबतचा उल्लेख, १३ जिलकाद/इ. स. १७९०-९१ (१२९६०).

**बाजी—(—)** : दादासाहेबांच्या (रघुनाथराव) कडोडा वरील हालचालीसंबंधीचे बातमीपत्र, ११ सवाल, सु. ११७४/२६ डिसें. १७७३ (१२८८०).

**बाळकृष्ण महादेव—(—)** : खोपवलीस इंग्रजांची सापडलेली अहिरण तोफखान्यास परत करण्याबाबत, ५ ज. वल (१२८८४).

**मल्हार बाबुराव—(—)** : श्रीमंत (रघुनाथराव) खंबायतेहून सुरतेस गेले व पुढे मुंबईस असल्याची वदंता, बातमीची शहानिशा करून घेण्याची विनंती, चैत्र व. ९, सोमवार/इ. स. १७७४-७५ (१२९०९); हुंडीची रक्कम त्वरित (सोनगडनजिक) पाठविणे बाबत, पुरंधर पर्यंत डाकेचा बंदोबस्त चोख करण्याची विनंती, १८ र. खर/इ. स. १७७४-७५ (१२९१६); बारडोली येथून जासुदांच्या रोजमुऱ्याची व्यवस्था, बनवाबनवीपासून सावध राहण्याचा इशारा, १७ सवाल/इ. स. १७७४-७५ (१२९१७).

**मल्हार रावजी—(—)** : इंग्रज सोनगडचे दक्षिण तीरास असल्याबाबत, स्वत: व कासीद घाटाखाली जात असल्याबाबत, १७ सफर/इ. स. १७७४-७५ (१२९२२).

**विसाजी कृष्ण—(—)** : साष्टीचे मसलतीकरिता दादोपंत गोडबोले याजबरोबर आलेल्या प्याद्यांची परत रवानगी, २१ सफर/इ. स. १७७४-७५ (१२८८१); सांडणीस्वारास एक रुपया खर्चास दिला त्याचा हिशेब घेणे, पा॥. ५ जिलकाद, सु. ११७५/८ जाने. १७७५ (१२९१३).

**शंकराजी खंडेराव—(—)** : सौ. आनंदीबाईचा अंकलेश्वरास मुक्काम असल्याबाबत बातमीपत्र, १७ सवाल/इ. स. १७७४-७५ (१२९४२); खासा स्वारीचा तापी तीरावरील मुक्काम, आबाजी महादेव, खंडेराव पवार वगैरेंचे गोविंदराव गायकवाड यास आणण्याकरितां प्रयाण, २९ सवाल, सु. ११७५/२ जाने. १७७५ (१२९५१); दादा साहेबांचा (रघुनाथराव) मुक्काम आहे तेथेच, खर्चाकरिता पैशाची निकड, १६ सवाल, सु. ११७५/१० डिसें. १७७६ (१२९५३); सौ. आनंदीबाईचा पारनेरापाशी मुक्काम असल्याबाबत व इंग्रज सरंजामसुद्धा लष्करांत आल्याची बातमी, इ. स. १७७४–७६ (१२९८१).

**श्रीराम श्रीधर—(—)** : महंमद इसाब याने जे ठाणे घेतले आहे ते परत घेण्याबाबतची योजना व तेथील वस्तुस्थितीचा आढावा (१२९७३).

**सदाशिव रघुनाथ—(—)** : दादासाहेब (रघुनाथराव) यांची रतनेगांव, तापीतीर येथील हालचाल, १९ सवाल/इ. स. १७७३–७५ (१२८८३).

**(फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली)**

**(—)—गणेशपंत** : भडोचला गंभीरराव याची जाबसाल घेण्याकरिता भेट, कोशलदार येईपर्यंत वाट पहाण्याविषयी आज्ञा (१२८९८).

पत्रे—चालू

(—)—**नाना** (नाना फडणीस) : मातबर सरदार व संस्थानिक यांना मेजवानीप्रसंगी व निरोपसमई द्यावयाच्या वस्तू वगैरे दप्तरातून दाखल्याप्रमाणे लिहून पाठविल्याबाबत, ४ ज. वल, सु. ११७६/३ जुलै १७७५ (१२९७०).

(—)—**नारोपंत** : आपणाकडे पत्र घेऊन आलेल्या जासुदजोडी बरोबर सोबत देऊन हरीपंताकडे पत्रे देण्यास पाठवावे म्हणून विनंती (१२८९४).

**(प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली)**

रघुनाथरावांचा पाठलाग करण्याची जबाबदारी योग्य तऱ्हेने पार पाडली जाईल याबाबत आत्म नालबंदीचे, इ. स. १७७४-७५ (१२८८९); फौजेच्या खर्चास होळकराकडील ऐवज मिळाला असून विश्वास खर्चास ऐवजाचा तुटवडा (१२८९०); हफीमुद्दीखां याची नवापूर, छीपाबांडा, शाहाजानाबाद येथील हालचाल, इ. स. १७७३–७५ (१२८९२); उमरटे येथील गाव उज्याड करण्याविषयी आज्ञा, इ. स. १७७४–७५ (१२८९९); नवाब हैदरअल्लीखान याचेशी झालेल्या दोस्तीचे कराराबाबत, इ. स. १७७३–७५ (१२९००); धोम मुक्कामी राजश्री स्वामींची व दादासाहेबांची (रघुनाथराव) भेट झाल्याबाबत, १० रजब, शुक्रवार (१२९०२); नागपूरचे कारकून श्री. खंडो मुकुंद यांना महाराजांचे आज्ञेवरून नागपूराहून परत बोलावणे (१२९२७); आज्ञेप्रमाणे रामचंद्र गणेश याजबरोबर महीस जाण्याकरितां एक हजार फौज देत असल्याबद्दल, इ. स. १७७४-७५ (१२९४४); जनरल गोदार्द व बोडम यांचे बाबतची तक्रार हार्नबी जवळ रघुनाथराव याजकडून, इ. स. १७७८-७९ (१२९४८); सुरतेकडील बातमी, फौजेची जमवाजमव व हालचाल, इ. स. १७७३–८३ (१२९६७); मौनतदौल याजकडील वार्तापत्र, लष्करचे कहीचे उपद्रव शहरास फार होत असल्याबद्दल तक्रार, २९ रमजान (१२९६८); पट्टीची व पैक्याची तरतूद होळकराकडून होत नसल्याबाबतची तक्रार व इतर अनेक अडचणीचे कथन (१२९७२).

---

**पुडके क्रमांक ६**

का. सं. ७७ (१२९८९—१३०६५), सु. स. ११२१—१२०१, इ. स. १७२०–१८००.

पत्रे :

**कृष्णशहा राजे—पंत प्रधान** (बाजीराव बल्लाळ) : तीर्थरूप बाबासाहेब यांचा मृत्यू, रुद्राजी विश्वनाथ यांच्या सांगण्याप्रमाणे कावनईकर व भास्कर गडकरी यांची वर्तणूक व त्याबद्दल शंकराजी केशव व त्रिंबक विनायक यांना पत्रे रवाना, पूर्ववत् सांभाळ करण्याची विनंती, इ. स. १७२०–४० (१३०६५).

**गणेश बल्लाळ ओक—पंत प्रधान** (माधवराव नारायण) : आज्ञेप्रमाणे सय्यद अहंमदकडील गाडदी व नांवनिशीचा जाबता राघो विश्वनाथकडे कल्याण येथे रवाना केल्याबद्दल निवेदन, ३० ज. वल, सु. ११८१/२५ मे १७८१ (१३०२९).

**गंगाधर** (गोंविद भानू)—**नाना** (फडणीस) : जानराव धुळप याची समजूत घालून विसाजी केशवकडे आरमारास रवाना करण्याच्या आज्ञेबद्दल निवेदन, २५ सवाल, सु. ११७७/७ डिसें. १७७६ (१२९८९); —**पंत प्रधान** (माधवराव नारायण) : आंबे रवाना, २३ र. वल, सु. ११७५/२४ मे १७७५ (१२९९२); रामचंद्र शामजी व गोलंदाज यांना विजयदुर्ग येथील सर्व तोफा दाखवून त्याचा जाबता हुजूर रवाना, ४ जिल्हेज, सु. ११८७/२८ सप्टें. १७८६ (१३०१८); गिर्जोजी बर्गे याच्या पागेकडील बारगीर व शिलेदारांच्या रोजमुऱ्यासंबंधी निवेदन, १ ज. खर, सु. ११८१/५ जून १७८० (१३०१९); विजयदुर्गचे लोक इंग्रजांकडे चाकरीस जाऊ नयेत व सावकारांनी मुंबईकडून मीठ आणू नये म्हणून केलेल्या बंदोबस्ताबद्दल निवेदन, २५ रमजान, इ. स. १७७४–९५ (१३०२०); गणेश भट देवधर यांस गावडेगांवकर यांजकडून मिळालेल्या जमिनीच्या मशागतीस लागणाऱ्या ऐवजाची तरतूद करण्याची विनंती, इ. स. १७७४–९५ (१३०२३); गोपाळ गणेश व पांडुरंग बल्लाळ केळकर यांचे कसबे राजापुर येथील दलालीचे हक्क बंदरचे सावकारांकडून वसूल करून देणे व चौथाई सरकारांत जमा करण्याबद्दल केलेल्या आज्ञेसंबंधी निवेदन, ८ जिलकाद, सु. ११७५/११ जानेवारी १७७५ (१३०२७); गणेश विठ्ठल भिडे याचे अडिवरे गांवचे सरखोतीचे वतन

पत्रे—चालू

पूर्ववत् चालविण्यासंबंधी विनंती, १५ साबान, सु. ११८१/१७ ऑगस्ट १७८० (१३०३०); शेख लाल जमातदार पथकासह हुजूर चाकरीस रवाना, ३ रजब, सु. ११८१/६ जुलै १७८० (१३०४१); विजयदुर्ग येथील फौजेच्या भरण्याबद्दल व त्यांच्या ऐवजाबद्दल निवेदन, फिरंगी व हैदराचे आरमार येत असल्याच्या वाडी मालवणकडील बातमीवरून चौकशीस आरमाराकडील गलबत व जानराव धुळप रवाना, इंग्रजांचे सामर्थ्य व जंजिऱ्याच्या बंदोबस्ताबद्दल व सुवर्णदुर्ग, रत्नागिरीकडे वरचेवर बातमी कळवित असल्याबद्दल निवेदन, २९ जिल., सु. ११७५/१ फेब्रुवारी १७७५ (१३०६३);— **मोरोपंत**: मोसंब्याची कागदपत्रे विल्हेस लावण्याची विनंती, २९ सफर, सु. ११८८/१० डिसेंबर १७८७ (१३००७); विजयदुर्ग येथील आरमाराच्या बेगमीस नेमलेल्या गला व नक्त याच्या सनदा कृष्णाजी त्रिंबकबरोबर पाठविण्याची विनंती, २० मोहरम, सु. ११८८/१ नोव्हेंबर १७८७ (१३०४३).

**गंगाधर राम—नाना** (फडणीस): देहेरगोरट व कोरकडा परगण्याचा नेमणुकीपैकी राहिलेला नक्त व गला वसूल करण्याबाबत सरसुभेदारास आज्ञा करण्याची विनंती व वसुलीस उपद्रव न करण्याबद्दल किल्लेकऱ्याना ताकीद करण्याची विनंती (१३००६).

**परशराम रामचंद्र—नाना** (फडणीस): तोतयास सामील झाल्याबद्दल देवरुख व महिपतगड येथील गुन्हेगारीच्या वसुलीस अडथळा न करण्याबद्दल कारभाऱ्यांना ताकीद करण्यासंबंधी परशुरामभाऊ यास पत्र लिहिण्याची विनंती, ४ सफर, सु. ११८९/१३ नोव्हेंबर १७८८ (१३००२); रत्नागिरीचे लोक सरसुभ्याचे मदतीस रवाना, सरसुभेदाराचा रामगडाजवळ मुक्काम असून तिकडे जात असल्याबद्दल व हदरखान याच्या गलबतावरील माल घेऊन आल्याबद्दल लोकांना बक्षिसे देण्याची विनंती, ७ ज.खर, सु. ११८६/७ एप्रिल १७८६ (१३०५६).

**बाबुराव आंग्रे—राव पंडित प्रधान** (बाजीराव रघुनाथ): खांदेरी किल्याचा कबजा, ऑक्टोबर १८०० (१३०५५).

**बाजी गंगाधर—सुभेदार**: इंग्रजांकडील लढाऊ गलबते दारुगोळा भरून साष्टीवर फौजेसह गेल्याबद्दल व उरण, बेलापूरकडेही तयारीनिशी आणखी गलबते येणार असल्याबद्दलची बातमी, साष्टीच्या कुमकेस आलेले राऊत केळव्यास असल्याबद्दल निवेदन, इ. स. १७७४-९५ (१३०५८).

**बाबूराव पासलकर—नाना** (फडणीस): त्रिंबक गोपाळ याची अवचितगडाकडील तैनातीकडे सात महिने गैरहजेरी असल्याबद्दल व इतर नेमणुकीबद्दल निवेदन, २२, सवाल, सु. ११८८/७ ऑगस्ट १७८७ (१२९९४); अवचितगड, बिरवाडी, नागोठणे वगैरेच्या मामलतीबद्दल व पीक पहाणीबद्दल निवेदन, आज्ञेप्रमाणे राजापुरी सरसुभेदाराकडे माणसे रवाना, माजी मामलेदाराकडून शिबंदीचा ऐवज न आल्याबद्दल निवेदन, १ ज. खर, सीत, सु. ११८६/१ एप्रिल १७८६ (१२९९५); किल्ले बिरवाडी येथील दरवाज्याचे कामासंबंधी निवेदन, सचिवांनी काढलेल्या आगळिकीबद्दल निवेदन, ५ र. वल, सु. ११८८/१६ डिसेंबर १७८७ (१२९९६); गणेश बल्लाळ ओककडे अवचितगड येथील फडणिसी असतांना त्रिंबक विनायक याने केलेल्या चौकशीचे कागद रुजुवातीसाठी पाठविण्याची विनंती, २४ रमजान, सु. ११८७/२१ जुल १७८६ (१३०१०); अवचितगड व बिरवाडी येथील लावणीसंबंधी सूट देण्याची विनंती, १ मोहरम, सु. ११८८/१३ ऑक्टोबर १७८७ (१३०१२); अवचितगड व बिरवाडी येथील रुजुवातीस आलेल्या गोविंद लक्ष्मण याच्या तगाद्याबद्दल तक्रार व लवकर पत्रोत्तर पाठविण्याची विनंती, २० जिल., सु. ११८७/१४ सप्टेंबर १७८६ (१३०५९); अवचितगड व बिरवाडी येथील भात विक्री योग्य दराने होत नसल्याबद्दल व नागोठणे तप्यांतील खाऱ्या जमिनीच्या मळण्या होऊन धारा वसूल होऊन पुढील लावणी होण्यासंबंधी विनंती, ११ रजब, सु. ११८९/८ एप्रिल १७८९ (१३०६०);—**पंत प्रधान** (माधवराव नारायण): तालुके रेवदंडा येथील मामलेदारांनी मांडलेल्या तक्रारींबाबत निवेदन व त्यांना ताकीद करण्याची विनंती, १९ साबान, सु. ११८९/१५ मे १७८९ (१३०११); तालुके अवचितगड व बिरवाडी येथील मागील बाकीच्या फडशाबद्दल वरात होऊन पोता भरणा करण्याबद्दल आज्ञा व लोकांच्या खर्चाच्या बेगमीबद्दल विनंती, २४ रमजान, सु. ११८७/२१ जुलै १७८६ (१३०१७).

**भवानजी विश्वासराव हवालदार—नाना** (फडणीस): जयदुर्ग किल्ल्याचे डौले वेगळे ठेवण्यासंबंधी विनंती व जयदुर्गची मामलत जयरामपंताकडे गेल्याबद्दल निवेदन, १४ साबान, सु. ११८७/११ जून १७८६ (१३०४५); जयदुर्ग किल्याची बेगमी व बंदोबस्ताबद्दल निवेदन व दसऱ्याची [वस्त्रे देण्याबद्दल विनंती, ९ जिल्हेज, सु. ११८७/३ ऑक्टोबर १७८६ (१३०४७).

पत्रे—चालू

**भिकाजी गोविंद—नाना** (फडणीस) : वसई येथे जहाज धरल्यामुळे जंजिरकरांनी रत्नागिरीहून वसईस जाणारे आनंदराव राम याचे जहाज धरल्याबद्दल निवेदन, जंजिरकरांचे जहाज मालमत्तेसह सोडण्याबद्दल वसईकरांस सनद, राजपुरीहून पळालेला सिद्दी परत देण्याबद्दल जंजिकरांचे पत्र, माणकर व आनंदराव शिंदे यांच्या भाताच्या व्यवस्थेबद्दल निवेदन, २२ र. वल, सु. ११८४/१४ फेब्रुवारी १७८४ (**१३०३८**); वसईकरांचे गलबत जंजिरकरांनी सोडल्याबद्दल, जंजिरकरांचे गलबत सोडण्याबद्दल सरकारची सनद रवाना, जंजिरकरांशी झालेल्या तहासंबंधीचा जाबसाल, चिमाची माणकरकडील लोक रेवदंडयाहून तळयाकडे रवाना करण्याबद्दल, बिरवाडी व तळयाचे मामलेदारास सनदा पाठविण्याची विनंती, २९ र. वल, सु. ११८४/२१ फेब्रुवारी १७८४ (**१३०४०**).

**महादजी बल्लाळ—नाना** (फडणीस) : शंकराजी हरि सबनीस यास बाबुराव पासलकरांनी परस्पर पुण्याला पाठवून कुरडू येथे पहाऱ्यात ठेवल्याबद्दल निवेदन व कागदपत्र आणण्यासाठीं शंकराजी हरि यास तालुक्यास रवाना करण्याची विनंती, १६ रजब, सु. ११८८/२३ एप्रिल १७८८ (**१३००१**).

**माधवराव नारायण प्रधान—भिकाजी गोविंद** : विसापूर किल्याचा हवाला रघू सावंतकडून वाघोजी नाईक शिंदेकडे दिल्याबद्दलच्या कलमांचा तपशील, सु. ११८५/इ. स. १७८४-८५ (**१३०००**); —**विष्णू जनार्दन** : सुपे परगण्याचा वसूल सुरतकर मोगल व इंग्रजांना न देता नारो आनंदराव याजकडे देण्याची आज्ञा, २७ मोहरम, सु. ११७५/३० मार्च १७७५ (**१३०२६**); —**त्रिंबक भिकाजी** : तर्फ वनखल व बोरटी येथे शामलाकडील चोरट्यांचा उपद्रव व त्यांच्या बंदोबस्ताबद्दल निवेदन, सु. ११९३/इ. स. १७९२-९३ (**१३०३५**); —**लक्ष्मण हरि** : नरळ येथील किल्ले कोटाचा बंदोबस्त ठेऊन इंग्रज व हबशींचे बाबतींत सर्वांनी सावध राहण्याबद्दल आज्ञा, ४ जिलकाद, सु. ११८०/१३ नोव्हेंबर १७७९ (**१३०४४**).

**माधवराव बल्लाळ प्रधान—जानराव धुळप** : हैदर नाईक वगैरे शत्रुस आरमाराचीं दहशत बसवून स्वारी यशस्वी करण्याची आज्ञा, १९ जिल्हेज, सु. ११७२/२५ मार्च १७७२ (**१२९९८**); —**कृष्णाजी हरि** : विजयदुर्गाच्या बेंगमीस झांप देण्याबद्दल आज्ञा, २३ सवाल, सु. ११७२/२९ जानेवारी १७७२ (**१२९९९**); —**आनंदराव राम** : कल्याण, भिवंडी व नेरळपैकी आरमाराच्या बेगमीस आनंदराव धुळपकडे भात देण्याची आज्ञा, १३ साबान, सु. ११७२/२१ नोव्हेंबर १७७१ (**१३०३२**).

**मोरो बापूजी—पंतप्रधान*** : आज्ञेप्रमाणे सुवर्णदुर्गचा बंदोबस्त ठेऊन सावध असल्याबद्दल निवेदन, ११ ज. वल, सबा (**१३०४६**).

**राघो शंकर—तात्या*** : रामचंद्र गणेश यास फौजेसह कोकणचे घाटावर रवाना करण्याचा बेत, इंग्रजांशी तह न करण्याचा मनोदय, हरिपंताबरोबर सरंजाम रवाना, कृष्णराव बल्लाळ यास पाठविण्याबद्दल, नबाबाच्या पत्राचा तपशील, श्रीमंतासमक्ष डभइ येथे इंग्रजांशी फतसिंग गायकवाड याची भेट व तह, बडोदा येथे गमन, अहमदाबाद येथील बंदोबस्त करून महीतीराहून भडोच येथे प्रयाणाचा श्रीमंताचा बत असल्याची बातमी, आनंदराव जिवाजीकडील कारकून डभई येथे रवाना, २१ ज. खर/इ. स. १७७४–७६ (**१३०१६**).

**राघोजी आंग्रे—राणोजी बलकवडे** : तोतयास सामील झाल्यामुळे केलेल्या वरातेबद्दल व कोल्हटकरांनी रयतेस दिलेल्या उपद्रवाबद्दल निवेदन, १ ज. वल/इ. स. १७७४–७६ (**१३००३**); —**रावपंडित प्रधान** (माधवराव नारायण): कुशलतेसंबंधी मजकूर, २५ ज. वल, सु. ११७७/१२ जुलै १७७६ (**१३०३१**).

**विनायक केशव व आदाजी महादेव—बाबा*** : जामदारखान्याकडील कमी जास्तीचे ताळेबंद व्यंकाजीपंताजवळ असून त्याप्रमाणे सालाचे सालांत शेवटच्या तारखेस जमाखर्च करण्यासंबंधी आज्ञा करण्याची विनंती, ५ मोहरम (**१३००९**).

**विसाजी केशव—जानराव धुळप** : वसईपैकी विजयदुर्ग येथे असलेले जंगी सामान घेतल्यामुळे आरमाराच्या नेमणुकीपैकी ऐवज पाठविण्याबद्दल निवेदन, २६ जिलकाद, सु. ११७२/२ मार्च १७७२ (**१२९९०**); बसणीहून महिपतगड मार्गे विजयदुर्ग येथे येणार असल्याची सूचना, २४ मोहरम, चैत्र, सु. ११७२/२८ एप्रिल १७७२ (**१३०५७**); —**मोत्याजी विचारे** : स्वारीस जाण्यासंबंधीच्या आज्ञेबद्दल

*मूळ नावांची निश्चिती नाही.

निवेदन, १९ साबान, सु. ११७२/२७ नोव्हेंबर १७७१ (१२९९१); —नाना (फडणीस): प्रांत कोकणपट्टीमधील रसदेचा वसूल नारो श्रीपतकडे देण्याच्या आज्ञेसंबंधी कथन, १४ सवाल, खमस (१२९९३); घोंडो हरि याची गाडदी व शिलेदारांच्या हजेरीसह रवानगी (१३००५); —बाळाजीपंत फडणीस (नाना फडणीस): वसईपैकी आरमाराकडे दिलेल्या भातांचा झाडा सत्वर पाठविणे व बेहेड्याचे उपयोगी कागद व हजेऱ्या घेऊन पुण्यास सत्वर येण्याबद्दल सूचना, २८ र.खर (१२९९७); आरमाराच्या तयारीसंबंधी व सरकारांतून ऐवज घेण्यासाठी येण्याबाबत सूचना, ६ ज. वल (१३०२५); —आनंदराव धुळप: तर्फ संबदल येथील बंदोबस्तासंबंधीचा झाडा चौकशी करून सरसुभ्याकडे पाठविण्याची सूचना, २४ मोहरम, सु. ११७२/२८ एप्रिल १७७२ (१३००४); तर्फ संबदल येथील आरमारी तालुक्यांतील इनामतीच्या चौकशीस बाळाजी हरि सुभेदार रवाना केल्याबद्दल तेथील इनामदारांना ताकीदपत्र पाठविण्याची सूचना, १० सफर, सु. ११७२/१४ मे १७७२ (१३०२१); सालसीहून नारळी झिटे आरमाराच्या बेगमीस आणविण्याबद्दल सूचना, १८ सफर, सु. ११७२/२२ मे १७७२ (१३०२२); विजयदुर्गच्या आरमाराकडे संवदल माहालापैकी शाकारणीस झांप पाठविण्यासंबंधी सूचना, २६ जिल्हेज, सु. ११७२/१ एप्रिल १७७२ (१३००८).

**सखाराम भगवंत** (बोकील)—**रामचंद्रपंत**: नारोपंतास सोलापुरी लवकर पाठविण्याबद्दल व भिवराव पानसे याच्या मुलाच्या लग्नाबद्दल निवेदन, इ. स. १७७४–७९ (१३०३४).

**(फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली)**

**आबाजी बापूजी पिंपळेकर**—(—): किल्ल्याच्या बेगमीस झालेला खर्च धुळपाकडून परत देणे किंवा मामलतीची घालमेल न करण्याबद्दल विनंती (१३०५२).

**गंगाधर** (गोविंद भानू)—(—): फोंडा घाटाचा गोवेकरांकडून बंदोबस्त, टिपूचा बेळगांवच्या आसपासच्या मुलुखावर ताबा, विजयदुर्गच्या आरमाराची गणपतराव जिवाजीकडून तयारी, विजयदुर्गाहून बहिरगड येथे मुलुखाच्या बंदोबस्तास लोक रवाना, वगैरेसंबंधी निवेदन, २२ सफर, सु. ११८६/२५ डिसेंबर १७८५ (१३०३६); रवाना केलेल्या गुराबा व गलबतांनी सुरत बंदरातील इंग्रजांची बेकौली बोट धरून आणल्याबद्दल निवेदन, २० र. वल, सु. ११८७ पौष/११ जानेवारी १७८७ (१३०४२); गाड्यांच्या ऐवजाची तरतूद सत्वर करण्याबद्दल विनंती, ४ ज. खर, सु. ११८१/८ जून १७८० (१३०६१); १ साबान, सु. ११८१/३ ऑगस्ट १७८० (१३०६२).

**नरसो श्रीपत**—(—): लढाईची तयारी व बंदोबस्तासंबंधी निवेदन, ३० र. खर, सु. ११८१ वैशाख/२५ एप्रिल १७८१ (१३०२८).

**भिकाजी गोविंद**—(—): भातासंबंधी माणकर व आनंदराव शिंदे यांच्या तंट्याच्या बंदोबस्ताबद्दल निवेदन, मुलाच्या लग्नासाठीं शिंदे याचे पिंपलोली येथे गमन, ४ र. खर, आर्बा (१३०३९); जंजिरकराचा तह ठरल्यावर अकरा महालच्या ऐवजापैकी जंजिरकरांस कराराप्रमाणे द्यावयाच्या ऐवजाबद्दल, सुवर्णदुर्ग येथील मामलेदारास सनद देण्यासंबंधी विनंती, इ. स. १७७४–९५ (१३०५१).

**महादजी नारायण दिवेकर**—(—): साष्टीवर इंग्रजांचा कबजा, खर्चास ऐवज देण्याची विनंती, ७ रमजान, सु. ११७६ कार्तिक/१ नोव्हेंबर १७७५ (१३०३३).

**महादजी रघुनाथ**—(—): विजयदुर्ग येथील तयारी आनंदराव धुळप याच्या गैरहजेरीत चालू असतांना आलेल्या अडचणींबाबत व धुळप यास द्यावयाच्या सूचनांबाबत निवेदन, ४ रमजान, आषाढ, सु. ११८७/१ जुलै १७८६ (१३०५०).

**यादवराव रघुनाथ**—(—): श्रीमंतांच्या लष्करांतील फौज फिरंग्यांसुद्धां दहा बारा हजार असून चिमणराव याचा सोनगडावर हजार पांचशेसह मुक्काम, गायकवाड याच्या येण्यास विलंब, इंग्रजांचे लोक अहमदाबादला रवाना वगैरे बातमीबद्दल निवेदन, इ. स. १७७४–७६ (१३०६४).

**विठू सावंत भोसले व लक्ष्मण राव शिंदे**—(—): शामलाकडील शिपाई मामले तळेहून रवाना, बाळू मियाकडील महादजीपंत सहस्त्रबुद्धे जंजिरेकरांच्या हातात सापडल्याबद्दल, जंजिरकर व मदगडकर यांच्या म्हसले येथील स्वाऱ्या वगैरेसंबंधी श्रीवर्धनहून आलेल्या बातमीबद्दल निवेदन (१३०१४).

**सर्वोत्तम शंकर** —(—): सदाशिव अवधूत यास कुमकेविषयी केलेल्या आज्ञेबद्दल व कामासंबंधीचा आशय बाबुराव कृष्णबरोबर रवाना केल्याबद्दल व गाड्यांच्या रवानगीबद्दल निवेदन, १७ ज. खर (१३०१५).

दप्तर क्रमांक २१, पुडके क्रमां ६—चालू

पत्रे—चालू

(फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली)

(—)—**अंताजी रघुनाथ**: भिवराव यशवंतकडे फौज रवाना, सरदारांना समाधानपत्र रवाना, गाड्यांची भरती, मिरगड विसापूरकडे पत्रे रवाना, कर्जाचा भरणा यासंबंधी निवेदन, सु. ११७७/इ. स. १७७६-७७ (१३०४८).

(—)—**पंत प्रधान***: शामलांकडील ब्राह्मण बंदिवानांच्या मुक्ततेबद्दल माधवराव मामा यास विनंतीपत्र पाठविल्याबद्दल निवेदन, १ ज. खर (१३०२४).

(प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली)

राघोजी आंग्रे याच्या बेगमीबद्दल सूचना, २१ रजब/इ. स. १७७४–९३ (१३०४९); वसईच्या छावणीस शिवाजी विठ्ठल, कल्याणजवळ विसाजी कृष्ण राहिल्याबद्दल निवेदन व आबाजी यादव मुजुमदाराकडे अनगर्जुडी बातमीपत्र पाठविण्याची विनंती, पुण्यापैकी आलेल्या तोफेची पोच, इ. स. १७७४–८० (१३०५३); वसईच्या तरतुदेसंबंधी विनंती, इ. स. १७७४–८० (१३०५४).

फेरिस्त: सरसुभ्याच्या सनदांचे, सु. ११७२/इ. स. १७७१-७२ (१३०१३); हुजुरच्या सनदांचे, सु. ११७२/इ. स. १७७१-७२ (१३०३७).

---

पुडके क्रमांक ७

का. सं. ८२ (१३०६६—१३१४७), सु. स. ११७५—११९६, इ. सं. १७७४—१७९५.

अभयपत्रे:

**माधवराव पंडित प्रधान—प्रांत राजपुरी मामले तळे**: कोकणांत तोतयाच्या पारिपत्यासाठी सरकारी फौजा गेल्या असता रयतेस उपद्रव झाला तसा पुन्हां होणार नसल्याचे, १८ सवाल, सु. ११७७/३० नोव्हेंबर १७७६ (१३१३१); सु. ११७७/इ. स. १७७६-७७ (१३१३३).

पत्रे:

**अंताजी हरि गोखले—पंत प्रधान** (माधवराव नारायण): तोतयाप्रकरणी बाबुजी पाटणकराचे बायकोस व मुलांस कैदेतून जामीनावर सोडून द्यावे म्हणून विनंती, २० सफर, सु. ११७७/३० मार्च १७७७ (१३११३).

**आप्पाजीराव व बाबुराव पाटणकर—पंत प्रधान** (माधवराव नारायण): महादजी राजे भोसले मुंगीकर याने मानाजी शिंदे याजकडून पैसे घेऊन हैदरखानाकडे राजकारण जोडले असल्याबद्दल, ३ मोहरम, सु. ११७८/२ फेब्रुवारी १७७८ (१३१४६).

**उद्धव वीरेश्वर—पंत प्रधान** (माधवराव नारायण): आज्ञेनुसार राघोबा ठोसर यास हडसर किल्यावर बंदोबस्ताने ठेवल्याचे, १० जिल्हेज/इ. स. १७७४–१७९५ (१३०६८).

**कृष्णाजी नारायण भट—पंत प्रधान** (माधवराव नारायण): तोतयास सामील झालो नसून स्वतःचा जीव बचावण्यासाठीं पळून गेल्याचे निवेदन, २५ ज. वल, सु. ११७८/२ जुलै १७७७ (१३११२).

**केशव बल्लाळ देवधर—पंत प्रधान** (माधवराव नारायण): कृष्णाजी नारायण भट तोतयास सामील, २५ ज.वल, सु. ११७८/२ जुलै १७७७ (१३१११).

**केशव बहिरव—पंत प्रधान** (माधवराव नारायण): सदाशिव विश्वनाथ कोल्हटकर यांची तोतयासंबंधात जामीनकी, पुन्हा फंदफितूर केल्यास पकडून स्वाधीन करण्याचे आश्वासन, कार्तिक शु. ४, सु. ११७८/४ नोव्हेंबर १७७७ (१३०७१).

**खंडो त्रिंबक—पंत प्रधान** (माधवराव नारायण): आज्ञेनुसार गणेश तुकदेव व बापुजी नारायण यांच्या घरांची जप्ती व त्यांस कैद केल्याबाबत, १७ र. वल, सु. ११७९/५ एप्रिल १७७९ (१३१४२).

**गोविंद चिमाजी माणकर—पंत प्रधान** (माधवराव नारायण): सदाशिव नारायण बोकील कोरेगांवकर तोतयास कैद करण्याविषयी, २७ र. वल, सु. ११७९/१५ एप्रिल १७७९ (१३१४३).

---

*मूळ नावांची निश्चिती नाही.

पत्रे—चालू

**गोविंद रघुनाथ—पंत प्रधान** (माधवराव नारायण) : तोतयास सामील झाल्यामुळे धोंडो गोपाळ केळकर यास धनगड येथे बंदोबस्ताने अटकेत ठेवल्याबाबत, २९ जिल., सु. ११७७/१० जानेवारी १७७७ (१३१०४).

**चिमणाजी—काकासाहेब*** : तोतयाच्या हस्ताक्षराबाबत (१३१३८).

**नीलकंठ तुकदेव—पंत प्रधान** (माधवराव नारायण) : त्रिंबक सूर्याजी तोतयास सामील होते त्यांना जामीनावर सोडवून ते पुन्हा फितूर होणार नाहीत असे आश्वासन, भाद्रपद व. १३, श. १६९९/२९ सप्टेंबर १७७७ (१३१४४).

**बाबुराव पासलकर—राणोजी बलकवडे** : बिरवाडाकर व जयदुर्गकर लोक तोतयास सामील, १८ र. खर, सु. ११७७/२६ मे १७७७ (१३१००).

**बाळाजी कृष्ण बर्वे—पंत प्रधान** (माधवराव नारायण) : आबाजी आप्पाजी बर्वे यांनी दादासाहेबांकडे जाऊन फंद-फितूरी करू नये म्हणून दक्ष असल्याबाबत, आश्विन व. ५, श. १७०२/१८ आक्टोबर १७८० (१३१४५).

**भगवंतराव बापूजी—रावसाहेब*** : मुकुंदराव श्रीपत तोतयाकडे पुन्हा जाऊन गैरवर्तन करणार नसल्याची हमी, २७ ज. खर, सु. ११७९/२३ जुलै १७७८ (१३०९१).

**माधवराव नारायण—महिमाजी शिंदे** : तोतयाचे पारिपत्य करण्यासाठी भीवराव यशवंत यांस कुडंचे घाटावर मिळण्याची आज्ञा, ९ रजब, सु. ११७७/२४ ऑगस्ट १७७६ (१३०७४) ;—**विसाजी केशव** : तोतयाचे पारिपत्य करीत असतांना कोकण तालुक्यांत फौजांकडून शेतीभातीचे झालेल्या नुकसानीची मोजदाद करण्याविषयी सूचना, सु. ११७७/इ. स. १७७६-७७ (१३०८०) ;—**मोरो बापूजी** (फडके) : बाबुराव सालेकर तोतयास मिळाल्यामुळे सुवर्णदुर्ग येथील आरमाराचा सुभा त्याजकडून दूर करून भगवंतराव गाडे यास करार करून दिल्याबाबत, १ सवाल, सु. ११७९/२२ ऑक्टोबर १७७८ (१३०८३); बाळाजी वामन दामले यास तोतयाप्रकरणी सुमारगडी अटकेत ठेवण म्हणून आज्ञा, २० ज. खर, सु. ११७९/१५ जुलै १७७८ (१३१०७) ;—**किल्ले सुरगड येथील हवालदार व कारकून** : तोतयाचे बंडापासून सावधता राखून किल्याचा बंदोबस्त करण्याची आज्ञा, २४ रजब, सु. ११७७/८ सप्टेंबर १७७६ (१३०८८) ;—**भवानी शंकर** : तोतयाकडे कोकणांत हत्यारबंद जाणाऱ्या गोसाव्यांना प्रांत वाई येथून पुढे जाण्यास मनाई करून हुजूर पाठविण्याची आज्ञा, ९ रजब, सु. ११७७/२४ ऑगस्ट १७७६ (१३०९०) ; मोरभट मराठे तोतयास सामील झाला म्हणून त्याच्या घराची जप्ती करण्याविषयी, ६ सवाल, सु. ११७७/१८ नोव्हेंबर १७७६ (१३११४); सुखनिधान तोतयास सामील होऊन ज्या ब्राह्मणांनी दंगा केला त्या शिवाजी आप्पाजी वगैरे ब्राह्मणांस प्रायश्चित्य देण्याविषयी, ७ जिल., सु. ११७७/१९ डिसेंबर १७७६ (१३१२७);—**बापूजी शिंदे** : तोतयाच्या बंदोबस्तासाठीं भीवराव यशवंत फौजेनिशी रवाना, २४ रजब, सु. ११७७/८ सप्टेंबर १७७६ (१३०९२) ;—**गोविंदराव व चिमाजी माणकर** : येसाजी शिवाजी हशमनीस याने तोतयाचे पारिपत्य करतेवेळी उत्तम कामगिरी केल्यामुळे त्यास दिवट्या व आप्त्यागिऱ्याची तैनात खर्चाची सनद देण्याविषयी, १४ र. खर, सु. ११७७/२२ मे १७७७ (१३०९५); तोतयाचे व शामलाचे लढाईत कामकाज केल्याबाबत राजापुरी येथील लोकांस बक्षीस, १४ र. खर, सु. ११७७/२२ मे १७७७ (१३०९९) ;—**गोविंदराव माणकर** : प्रांत राजपुरी येथील तोतयांच्या पारिपत्यासाठीं फौजा रवाना केल्या त्यांच्या खर्चाबाबत, ३० जिलकाद, सु. ११७७/११ जानेवारी १७७७ (१३१२६) ;—**गोविंदराम** : कल्याण व भिवंडी येथील जे लोक तोतयास सामील झाले होते त्यांची चौकशी करून तपशीलाची मागणी, सु. ११८३/इ. स. १७८२-८३ (१३०९६) ;—**वाई येथील ब्राह्मणांस** : सुखनिधान तोतया कोकणांत रत्नागिरीस अटकेत असतां त्याजला शिवाजी अप्पाजी वगैरेनी सोडवून दंगा केला म्हणून त्यास सामील झालेल्यांस प्रायश्चित देण्याविषयी, ७ जिलकाद, सु. ११७७/१९ डिसेंबर १७७६ (१३११०) ;—**नारायण कृष्ण** : घोडभट कंटके या फितुरास चाकण किल्यावर अटकेत ठेवण्याविषयी, १० रजब, सु. ११७७/२५ ऑगस्ट १७७६ (१३११५) ;—**गणपतराव कृष्ण** : बाळाजी राम घाटचा तोतयास सामील झाल्यामुळे त्याचेकडील रायगडची फडणिशी दूर करून धोंडो

*मूळ नावांची निश्चिती नाही.

पत्रे—चालू

गणेश भाट्ये याजकडे दिल्यासंबंधी, ३ जिल्हेज, सु. ११७७/१४ जानेवारी १७७७ (**१३११७**); —**बाळकृष्ण केशव**: रामचंद्र शंकर सिधये यास तोतया प्रकरणी किल्ले पटा व रतनगड यथे कद, ९ रजब, सु. ११७७/२४ ऑगस्ट १७७६ (**१३११८-१३११९**); —**गणेश बल्लाळ**: तोतयास सामील झालेल्या बिरवाडी येथील लोकांच्याकडून गुन्हेगारीचा ऐवज जमा करून तपशीलवार झाडा पाठवून देण्याबाबत सूचना, सु. ११८३/इ. स. १७८२-८३ (**१३१२४**); —**बाजीराव रामचंद्र**: रंग दीक्षित मनोहर यांचे पुत्र तोतयास मिळाले हा दोष त्याचा नाही तरी रंग दीक्षित याजकडील नेमणुकीचा ऐवज देण्याची आज्ञा, १० जिल., सु. ११७८/११ डिसेंबर १७७७ (**१३१२५**); —**बाळाजी गणेश**: तोतया प्रकरणी गणेश केशव याजकडील रामगडची सबनिशी दूर करून जनार्दन नारायण याजकडे दिल्यासंबंधी, ३ जिल्हेज, सु. ११७७/१४ जानेवारी १७७६ (१३१४७).

**महादाजी नारायण**—**पंत प्रधान** (माधवराव नारायण): सिंहगडकरी तोतयास सामील झाल्याचे, १९ रमजान, सु. ११७७/२ नोव्हेंबर १७७६ (**१३१०९**).

**मोरो विश्वनाथ**—**पंत प्रधान** (माधवराव नारायण): तोतयाकडे चाकरीस गेलेल्या केदार सावंत सरदकर याची बायकामुलें, बंधू, घोडी व गुरे वगैरेची जप्ती करून हुजूरकडे पाठवित असल्याचे, २६ जिल्हेज, सु. ११७७/६ फेब्रुवारी १७७७ (**१३०८२**); काशीराव पाटणकर कोकणांत तोतयाकडे गेल्यास आज्ञेनुसार घरजप्ती करीन म्हणून आश्वासन, २१ रजब, सु. ११७७/५ सप्टेंबर १७७६ (**१३१०५**).

**मोरो हरि**—**नानासाहेब***: तोतया प्रकरणी अंजनवेल तालुक्यांत गुन्हेगारी वसुली, २७ जिल., सु. ११७७/८ जाने. १७७७ (**१३१२३**).

**राघो हिराजी**—**पंत प्रधान** (माधवराव नारायण): तोतया प्रकरणी कोनेर विश्वनाथ चोपडेकर याची चाकण किल्यातून सुटका करण्याबाबत जामीनकीस तयार असल्याचे, पौष व. १०, श. १६८८/३ फेब्रुवारी १७७७ (**१३१०३**).

**रामशास्त्री**—**वाई येथील ब्राह्मण**: तोतया प्रकरणी गंगाधर राम सोवनी यांस पंचगव्य देऊन प्रायश्चित देण्याबाबत, ३ रमजान, सु. ११८२/२४ ऑगस्ट १७८१ (**१३१०२**); —**रावसाहेब** (माधवराव नारायण): कोकणांत तोतयास सामील झालेल्या रामचंद्र नाईक परांजपे याचे बंधू व पुतणे कुटुंबाची माणसे या सर्वांस प्रायश्चित देऊन शुद्ध करण्याबाबत, १६ र. वल, सु. ११७८/१५ एप्रिल १७७८ (**१३०७७**); सदाशिव विश्वनाथ कोल्हटकर यास तोतया प्रकरणी प्रायश्चित्त देण्याबद्दल, सु. ११७७-७८/इ. स. १७७६-७८ (**१३१०८**); वासुदेव खरे यास प्रायश्चित्त देण्याबद्दल, १४ र. वल, सु. ११७७/२३ एप्रिल १७७७ (**१३१२८**); —**मोरोपंत**: सुभानजी सुर्वा, दिनकर रामचंद्र परांजपे तोतयास सामील म्हणून सुर्वा यांचे घराची जप्ती करण्याविषयी, २९ जिल्हेज, सु. ११७७/९ फेब्रुवारी १७७७ (**१३१२०**).

**वाघोजी शिंदे**—**पंत प्रधान** (माधवराव नारायण): कुसोली येथील कोणतीही व्यक्ती तोतयास सामील नसल्याचें निवदन, २३ ज. खर, सु. ११७८/२९ जुलै १७७७ (**१३०७३**).

**सदाशिव नारायण डोंगरे**—**आप्पा***: बाजीपंत याजवर तोतयाप्रकरणी ऐवजाची वरात, सु. ११७७/इ. स. १७७६-७७ (**१३१३९**).

**सदाशिव केशव**—**नानासाहेब***: गणेश विठ्ठल गोखले यास जामीनावर सोडून देत असल्याचे, १४ र. खर, सु. ११७७/२२ मे १७७७ (**१३१२२**); —**पंत प्रधान** (माधवराव नारायण): गोविंद यशवंत अभ्यंकर याचे हिंदले येथील घर तोतयाने जप्त केल्यासंबंधी, २ र. खर, सु. ११७७/१० मे १७७७ (**१३१०१**).

**सिवाजी दादाजी लिमये**—**पंत प्रधान** (माधवराव नारायण): त्रिंबक गणेश भट तोतयास सामील झाल्या कारणाने कैदेत असलेल्या त्याच्या बायको व मुलांस जामीनावर सोडवण्याबाबत विनंती, मार्ग. शु. ७, श. १७००/२६ नोव्हेंबर १७७८ (**१३१२१**).

**हरबाजी धुळप**—**पंत प्रधान** (माधवराव नारायण): तोतया प्रकरणी गावोगाव झालेल्या तपशीलवार महसूलाचा अंमल हुजूर पाठविल्याबाबत, ४ जिल., सु. ११७८/५ डिसेंबर १७७७ (**१३०८४**).

**हरि वामन**—**मोरोपंत**: देशमुख वगैरेपासून कर्ज काढून तोतयास दिलेल्या खंडाची परतफेडीची निकड लागल्याने त्यासंबंधीत विचारणा, ४ ज. खर, सु. ११७६/२ ऑगस्ट १७७५ (**१३०८७**).

*मूळ नावांची निश्चिती नाही.

पत्रे—चालू

(फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली)

**अंताजी रघुनाथ**—(—): रायगडावर व विजयदुर्गावर तोतयाचे बंड झाले असून गंगाधरपंत निघून गेल्याची वार्ता, १० र. खर, जेष्ठ/इ. स. १७७६-७७ (१३१३६).

**गोपाळ बल्लाळ**—(—): किल्ले कुरंगड येथे फौजेचे आगमन झाल्यामुळे तोतयाचे कोकणांत पलायन, गोविंदराव माणकर यांचे पडघवली येथे असलेल्या घरादाराचे व गुरांचे तोतयापासून संरक्षण करावे म्हणून विनंती, १६ रमजान, सु. ११७७/३० ऑक्टो. १७७६ (१३०८९); तोतयास सामील झालेल्या त्रिंबक चिमणाजी याचे बायको व मुलास सिंहगडी अटकेत ठेवल्याबद्दल, घायगुडे यांच्याकडील लोकांनी निजामपुरास लुटालूट केल्याबद्दल, १३ सबाल, सु. ११७७/२३ नोव्हें. १७७६ (१३०९८).

**राजाराम यादव**—(—): मोरोबादादाच्या राजकारणाबद्दल पंढरपूरहून आलेल्या ऐवजाच्या चौकशीसंबंधी, इ. स. १७७६-७७ (१३१४०).

**रामचंद्र**—(—): गोपाळ आप्पाजी जोशी तोतयास सामील म्हणून त्याचे घराची जप्ती करण्याविषयी, सु. ११७७-७८/इ. स. १७७६-७८ (१३०९७).

**विठ्ठलराव विश्वनाथ गाडगीळ**—(—): तोतयाप्रकरणी चिरंजीवांच्या घराची जप्ती, चिरंजीवांचे शोधाप्रित्यर्थ केलेली खटपट, १८ ज. खर, सु. ११७७/४ ऑगस्ट १७७६ (१३०७६).

**सखो मल्हार**—(—): कोकणांत तोतयाचे पारिपत्य करण्यासाठी सिंहगडावरील फौजेत अनुभवी लोकांची कमतरता, आर्थिक परिस्थिती फारच हलाखीची असल्याने पारिपत्यास पाठविणे अशक्य, १५ र. खर, सु. ११७६/३ जून १७७६ (१३०७८-१३०७९).

**सदाशिव अनंत**—(—): आंब्या घाटास तोतयाचे बंड माजले असल्याची बातमी, २१ रमजान, सु. ११७७/४ नोव्हें. १७७६ (१३०९४).

**सातारा येथील कुलाबकर**—(—): विजयदुर्ग व रत्नागिरी येथील कुलाबकर तोतयास सामील झाल्याने मोकाशाची जप्ती परंतु कृष्णाजी फराटे याचा तोतयाशी संबंध नसल्यामुळे पूर्ववत् मोकासे देण्याबाबत इ. स. १७७६-७७ (१३१३४).

(फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली)

(—)—**नानासाहेब***: गणेशपंत गोखले यांस तोतया प्रकरणी कैद, १४ र. खर, सु. ११७७/२२ मे १७७७ (१३१३०).

(—)—**बाजी बल्लाळ**—तोतयास सामील झाल्यामुळे गुन्हेगारीचा ऐवज देण्याविषयी, ५ र. खर, सु. ११७७/१३ मे १७७७ (१३१३२).

(—)—**बाळाजीपंत**: गणपतराव कृष्ण कोल्हटकर याने रायगड येथील जकीऱ्याचा ऐवज तोतयास दिला त्या ऐवजाच्या वसुलीसंबंधी, ७ साबान, सु. ११७८/१० सप्टें. १७७७ (१३१०६).

(—)—**मोरोपंत**: पार्वतीबाई हिचे बंधू सदाशिव विश्वनाथ कोल्हटकर व वासुदेव भट खरे यास तोतयाचा संसर्ग झाल्याने प्रायश्चित देण्याविषयी, १५ र. वल, सु. ११७८/१४ एप्रिल १७७८ (१३११६); तोतयांच्या दंग्यामुळे झालेल्या खर्चाबाबत, सु. ११७७/इ. स. १७७६-७७ (१३१२९).

(—)—**रहिस महंमद**: अंताजी रघुनाथ व बापूजी शिंदे यांनी तोतयांचे पारिपत्य घाटात केले हे ऐकून समाधान झाल्याबद्दल व लोकांचा रोजमुरा पावल्यासंबंधी, २४ रजब, सु. ११७७/८ सप्टें. १७७६ (१३०८५).

(—)—**वडील**: रामचंद्र नाईक परांजपे यांस प्रायश्चित देण्याबाबत, सु. ११७७/इ. स. १७७६-७७ (१३१३५).

(—)—**सखो मल्हार**: चंदनगडकऱ्यांस घाट माथ्यावर तोतयाकडील लोकांची माहिती काढून कळवावी म्हणून सूचना, १९ साबान, सु. ११७७/३ ऑक्टो. १७७६ (१३०८१).

(प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली)

तोतयास सामील असलेल्या लोकांना प्रायश्चित देण्याबाबतचा तपशील, सु. ११७७/इ. स. १७७६-७७ (१३०६६); तोतयास सरकारांत हजर करण्याबद्दल लष्करांतून चिठ्ठी आली त्यासंबंधी, सु. ११७७-७८/इ. स. १७७६-७८ (१३०६७); सदाशिवराव भाऊंचे (तोतयाचे) दोन हजार

*मूळ नावांची निश्चिती होत नाही.

पत्रे—चालू

(प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख असलेली)

फौजेनिशी पनवेलहून मुंबईस गलबतातून गमन, इ. स. १७७६-७७ (१३०६९); तोतया फितुरीच्या चौकशी प्रकरणीचे कागदपत्र दप्तरांत गोविंदपंत आपटे यांजकडे परत केल्याबद्दल, १२ सवाल, सु. ११७०/९ फेब्रु. १७७० (१३०७२); तोतया प्रकरणी व्यंकटराव घोरपडे याजकडील जप्ती सरंजामापैकी कांही नजर घेऊन मोकळा करण्याविषयी व फौजेच्या खर्चाबाबत ऐवजाची व व्यंकटरावास आणण्याकरिता अभयपत्रांची मागणी, ३० जिल., सु. ११७६/२३ जाने. १७७६ (१३०७५); विजयदुर्ग तालुक्यांत तोतयासंबंधी चौकशी केल्याबाबत, सु. ११७७-७८/इ. स. १७७६-७८ (१३०८६); तोतयाशी लढाई होऊन तोतया मारला गेल्याबद्दल व कृष्णराव शेणवी व जानोजी सिंदा यांची लष्करांत सिधा वगैरे देऊन राहाण्याची सोय केल्याबद्दल, ९ जिल., सु. ११७७/२१ डिसें. १७७६ (१३०९३); अंताजी बल्लाळ व बाजीराव रामचंद्र मेहेंदळे तोतयास सामील झाल्याची बातमी, सु. ११७७/इ. स. १७७६-७७ (१३१३७); मानाजी शिंदे हैदरखानाकडे सामील झाल्यामुळे कैद करून अटकेत ठेवल्याबद्दल, १७ ज. वल, सु. ११७९/१३ जून १७७८ (१३१४१).

रसानगी यादी :

बळवंतराव मल्हार याचे तोतया प्रकरणी जप्त केलेले "सोव इनाम" गाव मोकळे करून त्याजकडे चालविण्याबद्दल महादाजी बल्लाळ व मोकदमास वगैरे देण्याच्या पत्रांची, १२ जिल्हेज, सु. ११७७/२३ जाने. १७७७ (१३०७०).

---

## पुडके क्रमांक ८

का. सं. ३०० (१३१४८–१३१६७), सु. स. ११४१–११८६, इ. स. १७४०–१७८६.

अर्जदास्त :

**मतेखान नाईकवाडी—(—) :** निंबाळकर याच्या धामधुमीमुळे राजेगांव येथील झालेल्या खराबीबद्दल, १७ ज. खर, सु. ११४१/२९ ऑगस्ट १७४० (१३१५०).

कबज:

**सखोजी इंगळे—बाबुराव गुमास्ता देशपांडे सरकार जुन्नर :** नोकरीच्या तैनातेची पोच, १७ सफर, फसली ११४७/५ जून १७३७ (१३१४९).

खरेदीपत्र :

**हैबतजी पाटील जगताप—गोविंद पाटील जगताप :** घेतलेल्या कर्जाबद्दल सासवडमधील पाटीलकीच्या हिश्याचे, चैत्र शु. ११, श. १६८१/८ एप्रिल १७५९ (१३१५९).

पत्रे :

**आनंदराव गणेश चाफेकर—नानासाहेब* :** लोणीहून पुण्यास आगमन, लोकांचा रोजमुरा व रवानगी याबद्दल खुलासा, सखो रामचंद्र याच्या किल्ले कलानिधी व चांदवडहून आलेल्या पत्राबद्दल निवेदन, २ र. वल, सु. ११८६/३ जाने. १७८६ (१३१६२).

**गणेश केशव—त्रिंबकपंत व अंबादासभाऊ :** नाना फडणीस व बाळोबा यांचे पुण्याहून चावड येथे आगमन व दरबार, श्रीमंतांची कर्नाटकांत छावणी असल्यामुळे तिकडील ऐवज रवानगीसाठी रसद मागणी, चंद्रसेन याचा मृत्यू, निंबाळकरांचा आपसांतील तंटा, निजामअलीची हैदराबाद येथे छावणी व हैदराशी जाबसाल, श्रीरंगपट्टणवाल्यांच्या संस्थानवर कबजा, १५ मोहरम, सु. ११६७/२३ जून १७६६ (१३१६६).

**गोविंद महादेव—बापूजीपंत सरकडणोस :** इचलकरंजीकरास लष्करांत पत्रे रवाना करण्याची विनंती, गृहस्थाशी ममतेचे वर्तन, १७ ज. खर (१३१५३); रोजमुऱ्याची तजवीज व पागेकडील स्वारांची मागणी, १७ ज. खर (१३१५५).

---

*मूळ नावांची निश्चिती नाही.

## दप्तर क्रमांक २१, पुडके क्रमांक ८—चालू

पत्रे—चालू

**धोंडो राम—नाना*** : नबाबाने घेतलेली सुरापुर येथील खंडणी, गुंडमटकलकर लोकापलीकरांशी जाबसाल, श्रीमंतांच्या स्वारीमुळे कृष्णेपलिकडील मुलखाची खराबी, नबाबाचे कलबर्गा वरवालचे सुमारे कूच, ७ जिल्हेज, सु. ११६६/१७ मे १७६६ (**१३१५१**); व त्याबद्दल बापु यास, ७ जिल्हेज, सु. ११६६/१७ मे १७६६ (**१३१५२**); भोसल्यांकडील महालांच्या जप्तीवर लक्ष्मण कोन्हेरे याची नेमणूक केल्याबद्दल नबाब रूकनुद्दौला, शेरजंग व जगन्नाथपंत यांना पत्रे रवाना, उदाजी आटोळे यास रूकनुद्दौलाची ताकीदपत्रे पाठवण्याची तजवीज, मराठ्यांच्या मंगरूळपर्यंतच्या आगमनामुळे नबाबाच्या लष्करांत बंदोबस्त व नबाबाच्या भेटीस कृष्णराव बल्लाळ यांनी येण्याबद्दल नबाबाची अपेक्षा, २४ जाने. १७६६ (**१३१५४**) ; मोरोपंतासह रूकनुद्दौलाची भेट, रूकनुदौल व जगन्नाथपंत यांचे स्वामींकडे कूच, बगाची सरगर पांढरे, खंदावरकर, गिरधरसिंग वगैरेंचा जमाव, २८ रजब, सु. ११६६/१० जाने. १७६६ (**१३१६०**).

**नरसो तमाजी—स्वामी*** : बिरूर, तळाधडी, ठाणे व राजनकोळूर हुणसगी वगैरेमधील खंडणी घेऊन मोगल तालिकोटी येणार असल्याचे वर्तमान, ९ सवाल, तिसा (**१३१६३**).

**विसाजी केशव** (लेले)—**नाना*** : खासास्वारी कर्नाटकांत मसलतीसाठी असल्यामुळे कोकणपट्टीतील रसदेची तरतूद करणे व प्रांतातील लोकांच्या नेमणूका, रसदजाबता, सरसुभेदारी, शिबंदी याचा जाबता व शंकराजी केशव फडके यास सरसुभेदारी सांगितल्यापासूनचा आर्थिक घडामोडीचा जाबता यांच्या मागणीबद्दल खुलासा, २८ रमजान, फाल्गुन, खमस, सु. ११६५/२१ मार्च १७६५ (**१३१६१**).

**शेषो त्रिमल—बापूजीपंत** : विठ्ठलपंत याच्या आगमनानंतर लिंगोपंत यास चिकोडी येथे पाठविण्याचा बेत, जमावाची मागणी, बजाबा नाईक (निंबाळकर) याच्या ऐवजाच्या फडशाबद्दल निवेदन, १८ ज. खर (**१३१५६**).

**संताजी मोहिते हवालदार—पंत प्रधान** (माधवराव नारायण) : शिवनेरकर मोगलाचे दोघे भाऊ व महंमद हुसेन यांनी हडसर व कलोलगड घेऊ न देण्याचे औरंगाबादकरास वचन दिल्यामुळे परवारी लोकांची मागणी, किल्यावरील लोकांच्या अडसरीबद्दल निवेदन ९ साबान/इ. स. १७७४–८० (**१३१६७**).

### (फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली)

**बाजी गोविंद** (बर्वे)—(—) : खासा स्वारीचे पुण्याकडे कूच, सरंजाम झाडे श्रीमंतास दाखविण्याचा मनोदय, पुण्याहून गंगातीरी जाण्याचा श्रीमंतांचा मनोदय, त्रिंबकेश्वर, चावंड व घोडप्र येथे छपरबंदी, खानदेश, गुजराथ व गंगथडीवरील वरातझाडांच्या रवानगीबद्दल खुलासा, ३० जिलकाद/इ .स. १७६४–६७ (**१३१५८**).

**रामचंद्र जाधवराव**—(—) : विजापूर प्रांती आगमन झाल्याचे वर्तमान (**१३१४८**).

### (फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली)

(—)—**रावसाहेब** (माधवराव बल्लाळ प्रधान) : पुण्याकडील गडबडीमुळे श्रीमंतांनी नबाबास सामील करून घेणे किंवा आबाजी महादेव यास पुढे पाठवून स्थळशुद्धीनंतर खासा स्वारीचा जाण्याचा विचार, भेटीस नबाबाचा विरोध, बसालतजंगास नबाबाकडून निरोप, बसालतजंगाचा नबाबाशी मिलाफ, नबाब व रूकनुदौलाकडून श्रीमंताची कुमक होणे अशक्य याबद्दल घोडो राम यास आलेले पत्र, १५ जिल्हेज/इ. स. १७६१–७२ (**१३१६४**).

(—)—**पंत प्रधान*** : बदलापूरकर वगैरेकडून खंडणी घेऊन गुरमकोंड्यास बसालतजंग याच्या लष्कराचा तळ व किल्याकडे संधान, भगवंत त्रिंबक याजकडून किल्ला लढविण्याची शिकस्त, १७ साबान (१३१६५).

### (प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली)

तोफखान्याच्या साहित्याची तजवीज, पेट्यांतील निरखांचा बंदोबस्त याबद्दल खुलासा, ४ सफर (१३१५७).

---

*मूळ नावांची निश्चिती नाही.

# दप्तर क्रमांक २२

## पुडके क्रमांक १ ते २

### पुडके क्रमांक १

का. सं. ११९ (१३१६८–१३२८६), सु. स. ११२०–१२१६, इ. स. १७१९–१८१५.

**अभयपत्र :**

**वाईकर सुभेदार––पळशीकर मोकदम :** महिपतराव याची भीति न धरितां वाईला येण्याबद्दल, १५ साबान, सु. ११७६/११ ऑक्टो. १७७५ (१३२५५).

**आज्ञापत्रे :**

**पंत प्रधान** (माधवराव नारायण)––**पुणेकर वाणी व अडते :** सरकारांत नजर भरून शहरांत अडतीचा धंदा करून सुखरूप राहण्याबद्दल, सु. ११८६/इ. स. १७८५-८६ (१३२२९).

**बाईसाहेब*––रघुनाथ पंडित :** दत्त व तेज माळ्याकडून अडथळा होणारे कुरली येथील पाटीलकी वतन अमानत करून गणोजी सालोंखी याजकडे अंमल दिल्याबद्दल चाकणकर किल्लेदारास पत्रे लिहिणे व माळी, जमीनदार हुजूर पाठविण्याबद्दल, ११ सफर (१३२१२).

**पत्रे :**

**आप्पाजी गणेश बर्वे––पंत प्रधान* :** मालजी कामते यास त्याजकडील बटकीबाबत ताकीदपत्र देण्याची विनंती, फाल्गुन व. १३ (१३२०३).

**कृष्णराव अनंत––हरिपंततात्या :** कृष्णाजी मुरार कोटणीस यास त्याच्या प्रांत आंजरे येथील महाजनकीच्या वतनासंबंधी ताकीदपत्रे देण्याची विनंती, १६ जिलकाद (१३२८३).

**कृष्णाजी जगन्नाथ––नारोपंतनाना :** धावडशी संस्थानास लष्कर व पठाणांकडून होणारा उपद्रव व मामलतीबद्दल निवेदन, माळशीरस येथील चौथाई व गोठणेकरांकडील ऐवज श्रीपरशराम देवाच्या खर्चास देण्याबद्दल विनंती, (१३२८६).

**कृष्णाजी दादाजी––रावसाहेब** (माधवराव नारायण) : दादासाहेब यांचे निधन, आश्विन व. २, श. १७०५/१२ ऑक्टो. १७८३ (१३२०४).

**खंडेराव त्रिंबक––पंत प्रधान** (माधवराव नारायण) : प्रभू मंडळींच्या ब्रह्मकर्मासंबंधीच्या आज्ञेबद्दल निवेदन, ७ मोहरम, सु. ११९१/१७ सप्टें. १७९० (१३१८९–१३२०१).

**गंगाबाई––नारो बाबाजी :** दादासाहेबांकडील शिलेदारांच्या सरंजामाच्या जप्तीच्या कमाविशीवर नेमणूक केल्याची आज्ञा, २८ सफर, सु. ११७४/१० मे १७७४ (१३२१९); –– **आनंदराव जिवाजी :** अलीबहादूर याजकडील माणसांची सिंहगड येथे रवानगी, १६ मोहरम, सु. ११७४/२९ मार्च १७७४ (१३२२१) ;––**राघोजी आंग्रे :** बाजीराव साबाजी याजकडील सरंजाम पूर्ववत चालविण्याची आज्ञा, १४ जिल्हेज, सु. ११७४/२६ फेब्रु. १७७४ (१३२२२).

**गंगाधर गोविंद––पंत प्रधान** (माधवराव नारायण) : प्रभूंच्या ब्रह्मकर्माचरणासंबंधी आज्ञेप्रमाणे बंदोबस्त, २४ जिल्हेज, सु. ११९१/५ सप्टें. १७९० (१३१८६); सुवर्णदुर्गाकडे इंग्रजांची तरांडी फिरत असल्याने विशाळगड येथील अंमलाच्या जप्तीस थोडेच लोक पाठविल्याबद्दल निवेदन, १५ मोहरम/ इ. स. १७७४–९५ (१३२१०).

**चिमाजी माणकर––पंत प्रधान** (माधवराव नारायण) : श्रीहरिहरेश्वर व श्रीकाळभैरव या देवालयांच्या शाकारणीबद्दल निवेदन, २५ रबल, सु. ११७५/२६ मे १७७५ (१३२००); प्रभूंच्या ब्रह्मकर्माचरणासंबंधीच्या आज्ञेबद्दल खुलासा, २० जिल्हेज, सु. ११९१/१ सप्टें. १७९० (१३२६६).

**जगन्नाथ धोंडाजी––दादासाहेब** (राघोबादादा) : बादशाही बंदोबस्त व नबाबांचे कामकाजासंबंधी शंकराजी कमलाकर यांस सूचना, २० रमजान (१३२५९).

**जानराव यादव सोलसकर––नानासाहेब* :** मानसिंग यादव याच्याकडील कलावंतिणीचे मुलापासून वस्तभावेस उपसर्ग, वाई व नायगांव येथील वतनासंबंधी मानसिंग यादव व वाईकर देशपांडे यांस ताकीदपत्र देण्याची विनंती, (१३२६१).

**तुकोजी होळकर––पंत प्रधान** (माधवराव नारायण) : प्रभूंच्या ब्रह्मकर्माचरणासंबंधी आज्ञेनुसार बंदोबस्त, २२ साबान, सु. ११९१/२७ एप्रिल १७९१ (१३२६७).

---

*मूळ नावांची निश्चिती नाही.

